॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथ पञ्चमोऽध्यायः

## अवतरणिका

*श्रीभगवंताने चौथ्या अध्यायाच्या तेहतीसाव्यापासून सदतीसाव्या श्लोकापर्यंत कर्म तसेच पदार्थांच्या स्वरूपाचा त्याग करून तत्त्वदर्शी महापुरुषाजवळ जाऊन ज्ञान प्राप्त करण्याविषयी प्रचलित प्रणालीची प्रशंसा केली आणि त्यासाठी (४।३४ मध्ये) अर्जुनाला आज्ञा केली. तत्त्वज्ञान प्राप्त करण्याच्या या प्रणालीत कर्मांचा स्वरूपाने त्याग करून एकांतात परमात्मतत्त्वाचे मनन करणे आवश्यक आहे. अर्जुनाच्या मनात पूर्वीपासूनच युद्धरूप कर्म न करण्याचा भाव होता. कारण ते आपले कल्याण इच्छित होते आणि युद्धाला पाप समजत होते. म्हणून अर्जुनाने असे समजले की, भगवान् मला अशा प्रकारे कर्माचा स्वरूपाने त्याग करून ज्ञानप्राप्तीसाठी साधन करण्यास सांगत आहेत.*

*नंतर चौथ्या अध्यायाच्याच अडतीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले की, त्याच तत्त्वज्ञानाला साधक कर्मयोग-द्वारा स्वतः आपले-आपल्यातच निश्चित प्राप्त करून घेतो. भाव असा आहे की, कर्मयोगाच्या साधकाला ज्ञानप्राप्ती-साठी दुसऱ्या साधनांची तसेच तत्त्वदर्शी महापुरुषाजवळ निवास करण्याची मुळीच आवश्यकता नाही. त्यामुळे स्पष्टपणे तत्त्वज्ञानाच्या प्राप्तीत कर्मयोगाची विशेषरूपाने प्रशंसा झाली आहे.*

*अशा प्रकारे अर्जुनाने चौथ्या अध्यायाच्या तेहतीसाव्या श्लोकात ज्ञानप्राप्त करण्याविषयी प्रचलित प्रणालीची प्रशंसा ऐकली आणि चौतीसाव्या श्लोकात "**विद्धि**" पदाने त्या प्रणालीने ज्ञानप्राप्त करण्याविषयी आपल्यासाठी विशेष आज्ञा समजली. पुनः अडतीसाव्या आणि एकेचाळिसाव्या श्लोकात कर्मयोगाची प्रशंसा ऐकली. बेचाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला "**योगमातिष्ठोत्तिष्ठ**" पदातून कर्मयोगाच्या विधीने युद्ध करण्याविषयी आज्ञा केली. अशा प्रकारे ज्ञानयोग आणि कर्मयोग दोन्हींची प्रशंसा ऐकून तसेच दोन्ही आज्ञा मिळाल्याने अर्जुन हा निर्णय करू शकले नाहीत की, ह्या दोन्हीपैकी कोणते साधन माझ्यासाठी श्रेष्ठ आहे. म्हणून याचा निर्णय भगवंताकडूनच करविण्याच्या उद्देशाने अर्जुन प्रश्न करीत आहेत.*

*अर्जुन उवाच*

**सन्न्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्॥ १॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कृष्ण** | = हे कृष्ण! (आपण) | **योगम्** | = कर्मयोगाची | **सुनिश्चितम्** | = निश्चितरूपाने |
| **कर्मणाम्** | = कर्मांचा | **शंससि** | = प्रशंसा करत आहात. (म्हणून) | **श्रेयः** | = कल्याणकारक असेल, |
| **सन्न्यासम्** | = स्वरूपाने त्याग करण्याची | **एतयोः** | = या दोन्ही साधनांपैकी | **तत्** | = ते |
| **च** | = आणि | **यत्** | = जे | **मे** | = माझ्यासाठी |
| **पुनः** | = पुन्हा | **एकम्** | = एक | **ब्रूहि** | = सांगा. |

***व्याख्या*— सन्न्यासं कर्मणां कृष्ण**—कौटुंबिक स्नेहामुळे अर्जुनाच्या मनात युद्ध न करण्याविषयी भाव उत्पन्न झाला होता. त्याच्या समर्थनात अर्जुनाने पूर्वी पहिल्या अध्यायामध्ये अनेक तर्क आणि युक्तींही समोर ठेवल्या होत्या. त्यांनी युद्ध

करणे पाप आहे असे प्रतिपादन केले. (१।४५) ते युद्ध न करता भिक्षान्नावर जीवननिर्वाह करणे श्रेष्ठ समजू लागले (२।५) आणि त्यांनी स्वत:च निश्चय करून भगवंतांनासुद्धा स्पष्ट सांगून दिले की, मी कोणत्याही परिस्थितीत युद्ध करणार नाही. (२।९)

बहुतेक वक्त्याच्या शब्दाचा अर्थ श्रोता आपल्या विचारानुसार लावत असतो. स्वजनांना पाहून अर्जुनाच्या अंत:करणात जो मोह उत्पन्न झाला, त्यानुसार त्यांना युद्धरूपी कर्माच्या त्यागाची गोष्ट उचित वाटू लागली. म्हणून भगवंताच्या शब्दांना ते आपल्या विचारानुसार असे समजत आहेत की, भगवान्, कर्माचा स्वरूपाने त्याग करून प्रचलित प्रणालीनुसार तत्त्वज्ञान प्राप्त करून घेण्याविषयी, प्रशंसा करीत आहेत.

**पुनर्योगं च शंससि**—चौथ्या अध्यायाच्या अडतीसाव्या श्लोकात भगवंतांनी कर्मयोग्याला दुसऱ्या कोणत्याही साधने-शिवाय तत्त्वज्ञान निश्चित प्राप्त होण्याविषयी सांगितले आहे. त्यालाच अनुसरुन अर्जुन भगवंताला म्हणत आहेत की, आपण कधी तर ज्ञानयोगाची (४। ३३) प्रशंसा करत आहात आणि कधी कर्मयोगाची प्रशंसा करत आहात. (४। ४१)

**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्**—अशाच प्रकारचा प्रश्न अर्जुनाने दुसऱ्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात-ही "**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे**" पदाने केला होता. त्याच्या उत्तरात भगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात कर्मयोगाची व्याख्या करून त्याचे आचरण करण्यास सांगितले. नंतर तिसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात अर्जुनाने "**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्**" पदाने पुन: आपल्या कल्याणाविषयी विचारले, ज्याच्या उत्तरात भगवंतांनी तिसऱ्या अध्यायाच्या तीसाव्या श्लोकात निष्काम, निर्मम आणि नि:संताप होऊन युद्ध करण्याची आज्ञा केली. तसेच पस्तीसाव्या श्लोकात आपल्या धर्माचे पालन करणे श्रेष्ठ आहे हे सांगितले.

या ठिकाणी उपर्युक्त पदातून अर्जुनाने जी गोष्ट विचारली आहे त्याच्या उत्तरात भगवंतांनी म्हटले आहे की, कर्मयोग श्रेष्ठ आहे (५।२) कर्मयोगी सुखपूर्वक कर्मबंधनातून मुक्त होतो (५।३) कर्मयोगाशिवाय सांख्ययोगाचे साधन सिद्ध होणे कठीण आहे. परंतु कर्मयोगी तात्काळ ब्रह्माला प्राप्त होतो (५।६). ह्याप्रमाणे सांगून भगवान् अर्जुनाला, जणू असे सांगत आहेत की, तुझ्यासाठी कर्मयोगच शीघ्र आणि सुगमतेने ब्रह्माची प्राप्ती करविणारा आहे, म्हणून तू कर्मयोगाचेच अनुष्ठान कर.

अर्जुनाच्या मनात प्रामुख्याने आपल्या कल्याणा-विषयीचीच इच्छा होती, म्हणून ते वारंवार भगवंतासमोर स्वत:च्या कल्याणाविषयीचीच जिज्ञासा मांडीत आहेत. (२।७,३।२,५।१) कल्याणाच्या प्राप्तीत इच्छेची प्रधानता असते. साधनेच्या सफलतेत उशीर लागण्याचे कारण हेच आहे की, कल्याणाविषयीची इच्छा पूर्णपणे जागृत झालेली नसते. ज्या साधकाच्या ठिकाणी प्रखर वैराग्य नसते तेसुद्धा कल्याणाची इच्छा जागृत झाल्यावर कर्मयोगाचे साधन सुगमतेने करू शकतात.* अर्जुनाच्या अंत:करणात भोगाविषयी पूर्ण वैराग्य नाही परंतु त्यांचे ठिकाणी कल्याणाची इच्छा आहे, म्हणून ते कर्मयोगाचे अधिकारी आहेत.

पहिल्या अध्यायाच्या बत्तीसाव्या तसेच दुसऱ्या अध्यायाच्या आठव्या श्लोकाचे अवलोकन केले असता असे कळून येते की, अर्जुन, मृत्युलोकाच्या राज्याची तर गोष्टच सोडा, त्रैलाक्याचे राज्यसुद्धा इच्छित नव्हते. परंतु वास्तविक पाहिले तर अर्जुनाला राज्य तसेच भोग संपूर्णपणे नको होते असेही नाही. ते म्हणतात की, युद्धामध्ये कुटुंबियांना मारून राज्य तसेच विजय याची इच्छा मी करीत नाही. याचे तात्पर्य हे आहे की, जर कुटुंबियांना न मारता राज्य मिळत असेल तर त्याचा स्वीकार करण्यास मी तयार आहे. दुसऱ्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात अर्जुन हेच म्हणतात की, गुरुजनांची हत्या करून भोग भोगणे ठीक नव्हे. यातून असा ध्वनीही निघतो की, गुरुजनांना न मारता राज्य मिळाले तर मी त्याचा स्वीकार करीन. दुसऱ्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात अर्जुन म्हणतात की, कोण जिंकेल याचा आपणाला पत्ता नाही आणि त्यांना मारून आपण जगूही इच्छित नाही. याचे तात्पर्य असे आहे की, जर आपला विजय निश्चित होणार असेल, तसेच त्यांना मारल्याशिवाय राज्य मिळत असेल तर, मी त्याचा स्वीकार करण्यास तयार आहे. पुढे दुसऱ्या अध्यायाच्या सदतीसाव्या श्लोकात भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तुझ्या तर दोन्हीही हातात लाडू आहेत, जर युद्धात तू मारला गेलास तर तुला स्वर्ग मिळेल आणि जिंकलास तर राज्य मिळेल. जर अर्जुनाच्या मनात स्वर्ग तसेच संसाराच्या राज्याची थोडीसुद्धा इच्छा नसती तर

* योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया।-----------------------------॥
-------------------------। तेष्वनिर्विण्णचित्तानां कर्मयोगस्तु कामिनाम्॥

(श्रीमद्भा० ११।२०।६-७)

भगवान् असे म्हटलेच नसते. म्हणून अर्जुनाच्या अंतः-करणात भासमान होणारे वैराग्य वास्तविक नव्हे. परंतु त्यांचे ठिकाणी आपल्या कल्याणाची इच्छा आहे, जी या श्लोकातही दिसून येत आहे.

***संबंध**—आता भगवान् अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर देत आहेत.*

*श्रीभगवानुवाच*

**सन्न्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ।**
**तयोस्तु कर्मसन्न्यासात्कर्मयोगो विशिष्यते॥ २॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सन्न्यासः** | = संन्यास (सांख्ययोग) | **निःश्रेयसकरौ** | = कल्याण करणारे आहेत. | **कर्मसन्न्यासात्** | = कर्मसंन्यासापेक्षा (सांख्ययोगापेक्षा) |
| **च** | = आणि | | | | |
| **कर्मयोगः** | = कर्मयोग | **तु** | = परंतु | **कर्मयोगः** | = कर्मयोग |
| **उभौ** | = दोन्हीही | **तयोः** | = त्या दोन्हींपैकी (ही) | **विशिष्यते** | = श्रेष्ठ आहे. |

***व्याख्या***— [भगवंताच्या सिद्धांतानुसार सांख्ययोग आणि कर्मयोगाचे पालन, कोणत्याही वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादीची माणसे करू शकतात. कारण त्यांचा सिद्धांत एखाद्या वर्ण, आश्रम, सांप्रदाय यांना धरून नाही. याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात अर्जुनाने कर्मांचा त्याग करून विधीपूर्वक ज्ञान प्राप्त करण्याच्या प्रचलित प्रणालीला ''कर्मसन्न्यास'' नावाने म्हटले आहे. परंतु भगवंताच्या सिद्धांतानुसार ज्ञानप्राप्तीसाठी सांख्ययोगाचे पालन प्रत्येक मनुष्य स्वतंत्रतेने करू शकतो आणि त्याचे पालन करण्यासाठी कर्मांचा स्वरूपाने त्याग करण्याची आवश्यकताही नाही. म्हणून भगवान् प्रचलित प्रणालीचाही आदर करून आपल्या सिद्धांतानुसार अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर देत आहेत.]

**सन्न्यासः**—या ठिकाणी ''**सन्न्यासः**'' पदाचा अर्थ ''सांख्ययोग'' आहे, कर्मांचा स्वरूपाने त्याग नव्हे. अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर देत असताना, भगवान् कर्मांच्या त्यागपूर्वक संन्यासाचे विवेचन न करता, कर्म करत असताना ज्ञानप्राप्त करण्याचा जो सांख्ययोगाचा मार्ग आहे, त्याचे विवेचन करत आहेत. त्या सांख्ययोगद्वारा मनुष्य प्रत्येक वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादीमध्ये राहत असताना प्रत्येक परिस्थितीत स्वतंत्रतेने ज्ञान प्राप्त करू शकतो अर्थात् आपले कल्याण करून घेऊ शकतो.

सांख्ययोगाच्या साधनेत विवेक विचाराची प्रधानता असते. विवेकपूर्वक प्रखर वैराग्याशिवाय ही साधना सफल होत नाही. या साधनेत संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा अभाव असून केवळ एका परमात्मतत्त्वावरच दृष्टी राहते. आसक्ती नष्ट झाल्याशिवाय संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा अभाव होणे फार कठीण आहे. म्हणून भगवंतांनी देहाभिमानी पुरुषासाठी हे साधन दुःखदायक आहे असे म्हटले आहे (१२।५). याच अध्यायाच्या सहाव्या श्लोकातही भगवंतांनी म्हटले आहे की, कर्मयोगाचे साधन केल्याशिवाय संन्यासाचे साधन होणे कठीण आहे, कारण संसाराची आसक्ती नष्ट करण्यासाठी कर्मयोगच सुगम उपाय आहे.

**कर्मयोगश्च**—मनुष्यमात्राच्या ठिकाणी कर्म करण्या-विषयीची आसक्ती अनादिकालापासून चालत आली आहे, जिला नष्ट करण्यासाठी कर्म करणे आवश्यक आहे. (५।३) परंतु ते कर्म कोणत्या भावनेने आणि उद्देशाने, कसे केले जावेत की, ज्यामुळे कर्म करण्याविषयीची आसक्ती संपूर्णपणे नष्ट होईल, त्या कर्तव्यकर्म करण्याच्या कलेला ''कर्मयोग'' म्हणतात. कर्मयोगात कार्य लहान आहे अथवा मोठे यावर दृष्टी नसते. जे काही कर्तव्यकर्म समोर येईल त्यालाच निष्काम भावनेने, दुसऱ्याच्या हितासाठी करावयाचे असते. कर्मांशी संबंध-विच्छेद करण्यासाठी हे आवश्यक आहे की, कर्म आपल्यासाठी केली जाऊ नयेत. आपल्यासाठी कर्म न करण्याचा अर्थ असा आहे—कर्माच्या मोबदल्यात आपल्यासाठी काही तरी मिळविण्याची इच्छा नसणे. जोपर्यंत आपल्यासाठी काही तरी मिळविण्याची इच्छा राहत असते, तोपर्यंत कर्मांशी संबंध कायम राहतो.

**निःश्रेयसकरावुभौ**—अर्जुनाचा असा प्रश्न होता की, सांख्ययोग आणि कर्मयोग या दोन साधनांपैकी कोणते साधन निश्चितरूपाने कल्याण करणारे आहे? उत्तरात भगवान् म्हणतात की, हे अर्जुन! ही दोन्हीही साधने निश्चितरूपाने कल्याण करणारी आहेत. कारण या दोन्हींने एकाच समतेची प्राप्ती होते. याच अध्यायाच्या चौथ्या पाचव्या श्लोकातही भगवंतांनी याच विषयाचे समर्थन केले आहे.

तेराव्या अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकातही भगवंतांनी सांख्ययोग आणि कर्मयोग दोन्हीने परमात्मतत्त्वाचा अनुभव होण्याविषयी म्हटले आहे. म्हणून ही दोन्हीही साधने परमात्मप्राप्ती करून देणारी स्वतंत्र साधने आहेत. (३।३)

**तयोस्तु कर्मसन्न्यासात्**—एकाच सांख्ययोगाचे दोन भेद आहेत. एक तर चौथ्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात म्हटलेला सांख्ययोग, ज्यात कर्माचा स्वरूपाने त्याग सांगितला आहे आणि दुसरा दुसऱ्या अध्यायाच्या अकराव्या-पासून तीसाव्या श्लोकापर्यंत वर्णन केलेला सांख्ययोग, ज्यात कर्माचा स्वरूपाने त्याग सांगितला नाही. या ठिकाणी ''**कर्मसन्न्यासात्**'' पद दोन्हीही प्रकारच्या सांख्ययोगाचे वाचक आहे.

**कर्मयोगो विशिष्यते**—पुढील (तिसऱ्या) श्लोकात भगवंतांनी या पदांची व्याख्या करताना म्हटले आहे की, कर्मयोगी नित्यसंन्यासी समजण्या योग्य आहे. कारण तो सुखपूर्वक संसारबंधनातून मुक्त होत असतो. नंतर सहाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, कर्मयोगाशिवाय सांख्ययोगाचे साधन होणे कठीण आहे तसेच कर्मयोगी तात्काळ ब्रह्माला प्राप्त करून घेतो. तात्पर्य सांख्ययोगात तर कर्मयोगाची आवश्यकता आहे परंतु कर्मयोगात सांख्ययोगाची आवश्यकता नाही. म्हणून दोन्ही साधने कल्याणकारक असूनही भगवान् कर्मयोगच श्रेष्ठ आहे असे सांगत आहेत.

कर्मयोगी लोकसंग्रहासाठी कर्म करतो-''**लोक-सङ्ग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि**'' (३।२०). लोकसंग्रहाचे तात्पर्य आहे—निःस्वार्थभावनेने, लोकमर्यादा सुरक्षित ठेवण्यासाठी, लोकांना वाईट मार्गातून काढून सन्मार्गामध्ये लावण्यासाठी कर्म करणे अर्थात् केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच कर्म करणे, यालाच गीतेत ''यज्ञार्थ कर्म'' या नावानेही म्हटले गेले आहे. जो केवळ आपल्यासाठी कर्म करतो तो बांधला जातो (३।९,१३) परंतु कर्मयोगी निः स्वार्थभावनेने केवळ दुसऱ्यासाठीच कर्म करत असतो म्हणून तो कर्मबंधनातून सुगमतेने मुक्त होतो (४।२३) म्हणून कर्मयोग श्रेष्ठ आहे.

कर्मयोगाचे साधन प्रत्येक परिस्थितीत आणि प्रत्येक व्यक्तीकडून केले जाऊ शकते, मग ती व्यक्ती कोणत्याही वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादीची का असेना! परंतु अर्जुन ज्या कर्मसंन्यासाविषयी म्हणत आहेत, तो एका विशिष्ट परिस्थितीत केला जाऊ शकतो. (४।३४) कारण तत्त्वज्ञ महापुरुषाचे मिळणे, त्यांचे ठिकाणी आपली श्रद्धा होणे आणि त्यांच्याजवळ जाऊन राहणे—अशी परिस्थिती प्रत्येक मनुष्याला प्राप्त होणे शक्य नाही. म्हणून प्रचलित प्रणालीच्या सांख्ययोगाचे साधन एका विशिष्ट परिस्थितीमध्येच साध्य होऊ शकते, परंतु कर्मयोगाचे साधन प्रत्येक परिस्थितीत आणि प्रत्येक व्यक्तीसाठी साध्य आहे. म्हणून कर्मयोग श्रेष्ठ आहे.

प्राप्त परिस्थतीचा सदुपयोग करणे कर्मयोग आहे. युद्धा-सारख्या घोर प्रसंगीसुद्धा कर्मयोगाचे पालन केले जाऊ शकते. कर्मयोगाचे पालन करण्यात कोणताही मनुष्य, कोणत्याही परिस्थितीत, असमर्थ आणि पराधीन नाही, कारण कर्मयोगात काहीही मिळविण्याच्या इच्छेचा त्याग झालेला असतो. काही ना काही मिळविण्याची इच्छा राहिल्यानेच कर्तव्यकर्म करण्यात असमर्थता आणि पराधीनतेचा अनुभव होतो.

कर्तृत्व-भोक्तृत्वच संसार आहे. सांख्ययोगी आणि कर्मयोगी या दोघांनाही संसाराशी संबंध-विच्छेद करावयाचा असतो. म्हणून ह्या दोन्हीही साधकांनी कर्तृत्व आणि भोक्तृत्व —या दोन्हीला नष्ट करणे आवश्यक आहे. प्रखर वैराग्य आणि तीक्ष्ण बुद्धी असल्यामुळे सांख्ययोगी कर्तृत्व नष्ट करतो. तितके प्रखर वैराग्य आणि तीक्ष्ण बुद्धी नसल्याने कर्मयोगी, दुसऱ्याच्या हितासाठीच सर्व कर्म करून, भोक्तृत्व नष्ट करतो. अशा प्रकारे सांख्ययोगी कर्तृत्वाचा त्याग करून संसारापासून मुक्त होतो आणि कर्मयोगी भोक्तृत्वाचा अर्थात् काहीही मिळविण्याच्या इच्छेचा त्याग करून मुक्त होतो. असा नियम आहे की, कर्तृत्वाचा त्याग झाल्यास भोक्तृत्वाचा त्याग आणि भोक्तृत्वाचा त्याग केल्याने कर्तृत्वाचा त्याग आपोआप होतो. काही ना काही मिळविण्याच्या इच्छेनेच कर्तृत्व होत असते. ज्या कर्मापासून आपल्यासाठी कोणत्याही प्रकारच्या सुखोपभोगाची इच्छा नसते, ती केवल क्रिया असते कर्म नव्हे. जसे यंत्रात कर्तृत्व नसते तसेच कर्मयोग्याचे ठिकाणी कर्तृत्व राहत नाही.

साधकाला संसाराच्या प्राणी, पदार्थ परिस्थिती इत्यादीत स्पष्टपणे आपली आसक्ती दिसते. त्या आसक्तीला तो आपल्या बंधनाचे प्रमुख कारण मानतो, तसेच तिला नष्ट करण्याचा प्रयत्नही करतो. त्या असक्तीला नष्ट करण्यासाठी कर्मयोगी कोणत्याही प्राणी, पदार्थ इत्यादीला आपले मानत नाही.* आपल्यासाठी काहीही करत नाही तसेच आपल्यासाठी काहीही इच्छित नाही. क्रियेपासून सुख घेण्याचा भाव न राहिल्याने कर्मयोग्याच्या क्रिया परिणामी सर्वांचे हित करणाऱ्या तसेच वर्तमानकाळी सर्वांच्या प्रसन्नता आणि सुखासाठीच

* कर्मयोगी सेवा करण्यासाठी तर सर्वांना आपले समजतो परंतु आपल्यासाठी कोणालाही आपले समजत नाही.

होत असतात. क्रियेपासून सुख घेण्याचा भाव असल्याने क्रियेविषयी अभिमान (कर्तृत्व) आणि ममता होत असते. परंतु त्यापासून सुख घेण्याचा भाव संपूर्णपणे न राहिल्यावर कर्तृत्व समाप्त होत असते. कारण क्रिया दोषी नाहीत क्रियाजन्य आसक्ती आणि क्रियेच्या फलाची इच्छा असणे हेच दोष आहेत. जर साधकाने क्रियाजन्य सुख घेतले नाही तसेच क्रियेच्या फलाची इच्छा ठेवली नाही तर कर्तृत्व कसे राहील? कारण कर्तृत्व भोक्तृत्वावर टिकत असते. भोक्तृत्व न राहिल्याने कर्तृत्व आपल्या उद्देशात (ज्याच्यासाठी कर्म करतो त्यात) विलीन होत असते आणि एक परमात्मतत्त्वच शिल्लक राहत असते.

कर्मयोग्याचा "अहम्" (व्यक्तित्व) तात्काळ आणि सुगमतेने नष्ट होतो परंतु ज्ञानयोग्याचा "अहम्" दीर्घकाळ राहत असतो. कारण असे आहे की, "मी सेवक आहे" (केवळ सेव्यासाठी सेवक आहे, आपल्यासाठी नव्हे) असे मानल्यामुळे कर्मयोग्याचा "अहम्" ही सेव्याच्या सेवेत लागतो. परंतु "मी मुमुक्षु आहे" असे मानल्याने ज्ञान-योग्याचा "अहम्" त्याच्याबरोबर राहतो. कर्मयोगी आपल्यासाठी काहीही न करता केवळ दुसऱ्यासाठीच सर्व कर्म करतो परंतु ज्ञानयोगी आपल्या हितासाठी साधन करतो. आपल्या हितासाठी साधन केल्याने "अहम्" जसाच्या तसा कायम राहतो.

ज्ञानयोगामधील प्रमुख गोष्ट आहे—संसाराच्या स्वतंत्र सत्तेचा अभाव करणे आणि कर्मयोगाची प्रमुख गोष्ट आहे—आसक्तीचा अभाव करणे. ज्ञानयोगी विचारद्वारा संसाराच्या सत्तेचा तर अभाव करू इच्छितो परंतु पदार्थांविषयी आसक्ती असल्याने त्याच्या स्वतंत्र सत्तेचा अभाव होणे फार कठीण आहे. जरी विचार काळात, ज्ञानयोगाच्या साधकाला पदार्थांच्या स्वतंत्र सत्तेचा अभाव दिसत असतो, तरीपण व्यवहार काळात त्या पदार्थांची स्वतंत्र सत्ता प्रतीतीस येऊ लागते. परंतु कर्मयोगाच्या साधकाचा उद्देश दुसऱ्यांना सुख पोहचविण्याचा असल्याने त्याची आसक्ती आपोआप नष्ट होते. याशिवाय मिळालेल्या सामुग्रीचा त्याग करणे कर्मयोग्याला जितके सोपे जाते तितके ज्ञानयोग्याला नव्हे. ज्ञानयोगाच्या दृष्टीने, कोणत्याही वस्तूला, केवळ मायामय समजून, सहज रीतीने त्याचा त्याग करणे, अवघड जाते. परंतु तीच वस्तू कर्मयोगाच्या दृष्टीतून एखाद्याच्या उपयोगी पडत असल्याचे दिसल्यास त्याचा त्याग करणे सोपे जाते. जसे आपल्याजवळ काही घोंगड्या पडून आहेत तर त्या दुसऱ्याच्या उपयोगी येतात, असे समजल्यावर त्यांचा त्याग करणे, अर्थात् त्यांच्या ठिकाणी असलेली आपली आसक्ती नष्ट करणे, सामान्य गोष्ट आहे. परंतु (जर प्रखर वैराग्य नसेल तर) त्याच घोंगड्यांना विचार-द्वारा अनित्य, क्षणभंगुर स्वप्नातील मायामय पदार्थ समजून, सहज त्यांचा त्याग करणे कठीण आहे. दुसरी गोष्ट केवळ माया समजून त्याग करण्यात (जर प्रखर वैराग्य नसेल तर) ज्या वस्तूत आपली सुखबुद्धी नसते त्या टाकाऊ वस्तूंचा त्याग तर सुगमतेने होतो. परंतु ज्यात आपली सुखबुद्धी असते त्या चांगल्या वस्तूंचा त्याग करणे कठीण जाते. परंतु दुसऱ्याच्या उपयोगी येत असल्याचे पाहून ज्या वस्तूत आपली सुखबुद्धी आहे त्या वस्तूंचा त्याग सुगमतेने होतो. जसे भोजन करते वेळी ताटात जास्त झालेली पोळी काढून टाकावयाचा प्रसंग आला तर थंड झालेली, शिळी आणि टाकाऊ असलेलीच पोळी आपण काढून टाकू. परंतु तीच पोळी जर दुसऱ्याला द्यावयाची झाली तर चांगलीच पोळी दुसऱ्याला देऊ, टाकाऊ पोळी देणार नाही. म्हणून कर्मयोगाच्या प्रणालीने आसक्ती नष्ट केल्याशिवाय सांख्य- योगाचे साधन होणे फार कठीण आहे. विचारद्वारा पदार्थांची सत्ता मानत नसतानाही पदार्थांचे ठिकाणी असलेल्या स्वाभाविक आसक्तीमुळे भोगात फसून पतनापर्यंत जाण्याची शक्यता राहते.

केवळ असत्च्या ज्ञानाने अर्थात् असत्ला असत् जाणल्याने आसक्तीची निवृत्ती होत नाही.* ज्याप्रमाणे सिनेमामध्ये दिसणाऱ्या पदार्थांची सत्ता नसते—असे जाणत असूनसुद्धा त्याविषयी आसक्ती निर्माण होते. सिनेमा पाहण्याने चरित्र, समय, नेत्र, शक्ती आणि पैसा, या चार गोष्टींचा नाश होतो. असे जाणत असूनही आसक्तीमुळे मनुष्य सिनेमा पाहतात. यावरुन असे सिद्ध होते की, वस्तूची सत्ता नसतानाही त्याविषयी आसक्ती अथवा संबंध राहू शकतो. जर आसक्ती नसेल तर वस्तूची सत्ता मानूनही, त्याविषयी आसक्ती उत्पन्न होत नाही. म्हणून साधकाचे मुख्य काम आसक्तीचा अभाव करणे असले पहिजे, सत्तेचा अभाव करणे नव्हे. कारण बंधन करणारी वस्तू आसक्ती अथवा संबंधच आहे, केवळ सत्ता नव्हे. पदार्थ मग तो सत् असो अथवा

* जेव्हा आपल्या स्वरूपात स्थित होऊन असत्ला असत्रूपाने जाणतो, तेव्हाच असत्ला असत् जाणल्याने त्याची निवृत्ती होते. स्वरूपात स्थिती करणनिरपेक्ष आहे. परंतु बुद्धी इत्यादी करणांनी असत्ला असत् जाणल्याने त्याची निवृत्ती होत नाही, कारण बुद्धी इत्यादी करणसुद्धा असत् आहेत. म्हणून असत्च्या द्वारा असत्ला जाणल्याने त्याची निवृत्ती कशी होऊ शकते?

असत् असो, अथवा सत्-असत्हून विलक्षण असो जर त्याविषयी आसक्ती असेल तर तो बंधनकारकच होईल. वास्तविक पाहिले तर कोणताही पदार्थ आपणाला बंधनकारक नसतो. आपला संबंध जो आसक्तीने निर्माण होतो तोच आपणाला बांधतो. म्हणून आपल्यावर आसक्ती नष्ट करण्याचीच जबाबदारी आहे.

**परिशिष्ट भाव**—जरी 'योग' याविना कर्म आणि ज्ञान—दोन्हीही बंधनकारक आहेत तरी कर्म करण्याने तेवढे पतन होत नाही, जितके पतन वाचिक शिकलेल्या ज्ञानाने होते. वाचिक ज्ञान नरकांत घेऊन जाऊ शकते—

**अज्ञस्यार्धप्रबुद्धस्य सर्वं ब्रह्मेति यो वदेत्।**
**महानिरयजालेषु स तेन विनियोजितः॥**

(योगवाशिष्ठ, स्थिति० ३९)

'जो बेसमज मनुष्याला 'सर्व काही ब्रह्म आहे' असा उपदेश करतो, तो त्या मनुष्याला महान् नरकांच्या जाळ्यात अडकवितो।'

म्हणून वाचिक ज्ञान्यापेक्षा कर्म करणारा श्रेष्ठ आहे. मग जो कर्मयोगाचे आचरण करतो, त्याच्या श्रेष्ठतेबद्दल काय सांगावे! ज्ञानयोगी तर केवळ स्वत:साठी उपयोगी असतो, परंतु कर्मयोगी संपूर्ण संसारासाठी उपयोगी असतो. जो संसारासाठी उपयोगी असतो, तो स्वत:साठीही उपयोगी होतो—हा नियम आहे. म्हणून कर्मयोग विशेष आहे.

सांख्ययोगाविना तर कर्मयोग होऊ शकतो, परंतु कर्मयोगाविना सांख्ययोग होणे कठीण आहे (गीता ५। ६). म्हणून सांख्ययोगापेक्षा कर्मयोग विशेष आहे. सांख्ययोगापेक्षा कर्मयोग श्रेष्ठ आहे आणि कर्मयोगापेक्षा भक्तियोग श्रेष्ठ आहे (गीता ६। ४७). म्हणून गीतेत प्रथम सांख्ययोग, नंतर कर्मयोग आणि त्यानंतर भक्तियोग—या क्रमाने विवेचन केले गेले आहे.*

कर्मयोग आणि ज्ञानयोग फलात एक आहेत (गीता ५। ४-५). साधनेत कर्मयोग आणि भक्तियोग एक आहेत—**'मैत्रः करुण एव च'** (गीता १२। १३), कारण कर्मयोग आणि भक्तियोग—दोन्हीतही दुसऱ्याला सुख देण्याचा भाव राहतो. कर्म करण्यात कर्मी आणि कर्मयोगी एक आहेत (गीता ३। २५) तसेच तत्त्वज्ञ महापुरुष आणि भगवान्ही कर्म करण्यात बरोबरीचे आहेत (गीता ३। २२-२६). अशाप्रकारे कर्मी, ज्ञानयोगी, भक्तियोगी आणि भगवान्—चौघा बरोबर कर्मयोगी एक होतो—ही कर्मयोगाची विशेषता आहे.

सांख्ययोगात तर अहम्चा सूक्ष्म संस्कार राहू शकतो, परंतु कर्मयोगात क्रिया आणि पदार्थ यांच्यापासून संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यामुळे अहम्चा सूक्ष्म संस्कारही राहत नाही. कर्मयोगात अकर्म (अभाव) शिल्लक राहतो (गीता ४। १८) आणि सांख्ययोगात आत्मा शिल्लक राहतो (गीता ६। २९).

***संबंध**—आता भगवान् कर्मयोगाला श्रेष्ठ म्हणण्याचे कारण सांगत आहेत.*

## ज्ञेयः स नित्यसन्न्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति।
## निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते॥ ३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महाबाहो** | = हे महाबाहो! | | आकांक्षीही करीत | **निर्द्वन्द्वः** | = द्वन्द्वरहित (मनुष्य) |
| **यः** | = जो मनुष्य | **न** | = नाही, | **सुखम्** | = सुखपूर्वक |
| **द्वेष्टि** | = (कोणाशी) द्वेषही करीत | **सः** | = तो (कर्मयोगी) | **बन्धात्** | = संसारबंधनातून |
| **न** | = नाही (आणि) | **नित्यसन्न्यासी** | = सदा संन्यासी | **प्रमुच्यते** | = मुक्त होतो. |
| **काङ्क्षति** | = (कोणाची) | **ज्ञेयः** | = समजण्यायोग्य आहे, | | |
| | | **हि** | = कारण | | |

***व्याख्या*— महाबाहो—''महाबाहो''** संबोधनाचे दोन अर्थ होतात. एक तर ज्याचे हात विशाल आणि बलवान् आहेत अर्थात् जो शूरवीर आहे. दुसरा ज्याचे मित्र किंवा भाऊ थोर पुरुष आहेत. अर्जुनाचे मित्र प्राणीमात्राचे सुहृद

* भागवतातही हाच क्रम आहे—

योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया।
ज्ञानं कर्म च भक्तिश्च नोपायोऽन्योऽस्ति कुत्रचित्॥ (श्रीमद्भा० ११। २०। ६)

'स्वत:चे कल्याण इच्छिणाऱ्या मनुष्यासाठी मी तीन योगमार्ग सांगितले आहेत—ज्ञानयोग, कर्मयोग आणि भक्तियोग. या तिन्हीशिवाय दुसरा कोणताही कल्याणाचा मार्ग नाही.'

भगवान् श्रीकृष्ण होते आणि भाऊ अजातशत्रू धर्मराज युधिष्ठिर होते. म्हणून हे संबोधन देऊन भगवान् अर्जुनाला जणू हे म्हणत आहेत की, कर्मयोगानुसार सर्वांची सेवा करण्याचे सामर्थ्य तुझ्या ठिकाणी आहे. म्हणून तू सुगमतेने कर्मयोगाचे पालन करू शकतोस.

**यो न द्वेष्टि**—कर्मयोगी तो असतो जो कोणत्याही प्राणी, पदार्थ, परिस्थिती, सिद्धांत इत्यादीशी द्वेष करीत नाही. सर्वांची सेवा करणे, सर्वांना सुख पोहचविणे हे कर्मयोग्याचे काम आहे. जर त्याचा कोणाशीही यत्किंचित देखील द्वेष असेल तर त्याच्याकडून कर्मयोगाचे यथासांग रीतीने आचरण घडू शकणार नाही. म्हणून ज्याच्याशी थोडाही द्वेष असेल त्याची सेवा कर्मयोग्याने सर्वप्रथम केली पाहिजे.

सर्वप्रथम "**न द्वेष्टि**" पद देण्याचे तात्पर्य असे आहे की, जो कोणालाही वाईट समजतो आणि कोणाचेही वाईट करू इच्छितो तो कर्मयोगाच्या तत्त्वाला समजूच शकत नाही.

### मार्मिक गोष्ट

प्राणीमात्राच्या हिताच्या उद्देशाने कर्मयोग्यासाठी वाईटाचा त्याग करणे जितके आवश्यक आहे, तितकी चांगल्या आचरणाची आवश्यकता नाही. चांगल्या आचरणाने केवळ समाजाचे हित होते, परंतु वाईटाचा त्याग झाल्याने संपूर्ण विश्वाचे हित होत असते. कारण असे आहे की, चांगल्या आचरणात सीमित क्रिया आणि पदार्थांची प्रधानता असते. परंतु वाईटाचा त्याग होण्यात अंत:करणाचा असीम भाव प्रधान राहतो. जर अंत:करणातील वाईट भावना नष्ट झाल्या नसतील आणि बाहेरुन सोज्वळ आचरण झाले तर त्यामुळे अभिमान उत्पन्न होतो, जे आसुरी संपत्तीचे मूळ आहे. जेव्हा अंत:करणात काही ना काही वाईट भाव राहतात तेव्हाच चांगुलपणाचा अभिमान निर्माण होतो. ज्या ठिकाणी अपूर्णता (उणीव) असते, त्याच ठिकाणी अभिमानाची उत्पत्ती होत असते., परंतु जेथे पूर्णता असते, तेथे अभिमानाचा प्रश्नच निर्माण होत नाही.

सखोल विचार केला तर नाशवान् वस्तूंच्या साहाय्यते-शिवाय चांगुलपणा आचरणात आणता येणे शक्य नाही. ज्या वस्तूंच्या साहाय्याने आपण चांगुलपणाचे सोज्वळ आचरण करतो, त्या वस्तू आपल्या नाहीतच, तर त्यांच्याच आहेत ज्यांच्याशी आपण सोज्वळ आचरण करीत असतो. इतक्यावरही जर सोज्वळपणाचा अभिमान होत असेल तर तो नाशवानाशी संबंध झाल्याने होतो. जोपर्यंत नाशवानाचा संबंध आहे, तोपर्यंत "योगाची" सिद्धी होत नाही. मी चांगला वागलो—हा अभिमान वाईटापेक्षाही अधिक भयंकर आहे कारण हा भाव मीपणात येतो. कर्म आणि फल तर नष्ट होतात. परंतु जोपर्यंत मीपणा राहतो तोपर्यंत मीपणात राहत असलेला चांगुलपणाचा अभिमान नष्ट होत नाही. दुसरी गोष्ट अशी आहे की, वाईटपणाला तर आपण वाईट रूपाने जाणतोच परंतु चांगुलपणाला वाईटरूपाने जाणत नाही. म्हणून चांगुलपणाच्या अभिमानाचा त्याग करणे फार कठीण आहे, जसे लोखंडाच्या बेडीचा तर त्याग करू शकतो परंतु सोन्याच्या बेडीचा त्याग करू शकत नाही. कारण ती दागिने रूपाने आपल्याला दिसते. म्हणून वाईट-पणाचा त्याग करूनच चांगुलपणाचे आचरण केले पाहिजे. वास्तविक पाहता वाईटपणाचा त्याग झाल्यावर संपूर्ण विश्वाचे कल्याण आपोआप होते, करावे लागत नाही. म्हणून वाईटपणारहित झालेला महापुरुष जर हिमालयाच्या एखाद्या एकांत गुहेत बसला असेल, तरीही त्याच्याकडून विश्वाचे फार मोठे हित होत असते.

**न काङ्क्षति**—कर्मयोगात कामनेचा त्याग मुख्य आहे. कर्मयोगी कोणत्याही प्राणी, पदार्थ, परिस्थिती, इत्यादींची कामना करीत नाही. कामनेचा त्याग आणि परहित ह्यामध्ये परस्पर घनिष्ठ संबंध आहे. निष्काम होण्यासाठी दुसऱ्याचे हित करणे आवश्यक आहे. दुसऱ्याचे हित केल्याने कामनेच्या त्यागाविषयी सामर्थ्य निर्माण होते.

कर्मयोगात कर्ता निष्काम असतो कर्म नव्हे, कारण जड असल्यामुळे कर्म स्वत: निष्काम अथवा सकाम असू शकत नाहीत. कर्म, कर्त्याच्या अधीन असतात म्हणून कर्माची अभिव्यक्ती कर्त्याकडूनच होत असते. निष्काम कर्त्याकडूनच निष्काम कर्म होतात ज्याला कर्मयोग म्हणतात. म्हणून मग "कर्मयोग" म्हणा अथवा "निष्काम-कर्म" म्हणा—दोन्हीचा अर्थ एकच होतो. सकाम कर्मयोग नसतोच. निष्काम झाल्याने कर्ता कर्मफलाशी असंग राहतो परंतु जेव्हा कर्त्यात सकामभाव निर्माण होतो तेव्हा तो कर्मफलाशी बांधला जातो (५।१२). जेव्हा कर्ता कोणतेही कर्म आपल्यासाठी करत नाही उलट संपूर्ण कर्म दुसऱ्याच्या हितासाठीच करतो, तेव्हाच सकामभाव नष्ट होतो. म्हणून कर्त्याचा भाव नित्य निरंतर निष्काम रहावयास हवा. कर्त्यात जितका निष्कामभाव असेल तितकेच कर्मयोगाचे योग्य आचरण होईल.

कर्ता संपूर्णपणे निष्काम झाल्यावर कर्मयोग सिद्ध होतो.

**ज्ञेयः स नित्यसन्न्यासी**—अर्जुनाने युद्ध न करता

भिक्षेवर उदरनिर्वाह करण्याची इच्छा प्रगट केली होती— **"गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके"** (२।५) अर्थात् गुरुजनांची हत्या करण्याऐवजी संन्यास घेणेच श्रेष्ठ आहे. भगवान् याच गोष्टीविषयी उत्तर देताना जणू असे सांगत आहेत की, हे अर्जुना, तो संन्यास तर गुरुजनांच्या हत्येच्या भयामुळे घेतलेला बाहरी संन्यास आहे, परंतु कर्मयोग्याचा संन्यास रागद्वेषाच्या त्यागातून होत असल्याने, नित्य संन्यास अर्थात् आंतरिक तसेच खरा संन्यास होय.

पुढे सहाव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकातही भगवंतांनी केवळ अग्नीचा त्याग करणाऱ्या अर्थात् केवळ संन्यासाश्रम ग्रहण करणाऱ्या पुरुषाला संन्यासी न म्हणता, अंतःकरणातून संसाराच्या आश्रयाचा त्याग करणाऱ्या कर्मयोग्यालाच संन्यासी म्हटले आहे. अशा प्रकारे भगवंताच्या मनात कर्मयोगीच वास्तविक संन्यासी आहे.

कर्म करत असतानाही कर्माशी कोणत्याही प्रकारचा संबंध न ठेवणे हाच संन्यास आहे. कर्माशी कोणत्याही प्रकारचा संबंध न ठेवणाऱ्याला कर्माचे फल कधीही कोणत्याही अवस्थेत, किंचिन्मात्रही भोगावे लागत नाही. **"न तु सन्न्यासिनां क्वचित्"** (१८।१२) म्हणून शास्त्रविहित संपूर्ण कर्म करत असतानाही कर्मयोगी सदा संन्यासीच आहे.

कर्मयोगाचे अनुष्ठान केल्याशिवाय सांख्ययोगाचे पालन होणे कठीण आहे. म्हणून सांख्ययोगाचा साधक पूर्वी कर्मयोगी असतो, मग संन्यासी (सांख्ययोगी) होतो. परंतु कर्मयोगाच्या साधकाला सांख्ययोगाचे अनुष्ठान करण्याची आवश्यकता राहत नाही. म्हणून कर्मयोगी आरंभापासूनच संन्यासी आहे.

ज्याचे रागद्वेष संपूर्णपणे नष्ट झाले आहेत त्याला संन्यासाश्रमाची आवश्यकता नाही. कोणत्याही व्यक्ती, वस्तू, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी आपल्या नाहीत आणि आपल्यासाठीही नाहीत—असा निश्चय झाल्यावर राग-द्वेष नष्ट होऊन तसाच यथार्थ अनुभव येतो. मग व्यवहारात संसाराशी संबंध दिसत असला तरी अंतः-करणातून (राग-द्वेष नसल्यामुळे) संबंध नसतोच. हाच "नित्यसंन्यास" आहे. लौकिक अथवा पारलौकिक प्रत्येक कार्य करतेवेळी कर्मयोग्याचा संसाराशी संपूर्ण-पणे संन्यास राहतो म्हणून तो नित्यसंन्यासीच समजण्या योग्य आहे.

संसाराशी संबंध-विच्छेद अर्थात् लिप्ततेचा अभावच संन्यास आहे आणि कर्मयोग्याचे ठिकाणी राग-द्वेष नसल्याने संसाराशी लिप्तता राहतच नाही. म्हणून कर्मयोगी नित्य-संन्यासी आहे.

**निर्द्वन्द्वो हि..........सुखं बन्धात्प्रमुच्यते—** *साधनेच्या आरंभी साधकाच्या अंतःकरणात द्वन्द्व राहत असते. सत्संग, स्वाध्याय, विचार इत्यादी केल्याने तो परमात्म-प्राप्तीला तर आपले ध्येय मानतो. परंतु त्याची आपली म्हणविली जाणारी मन, इंद्रिये इत्यादींची रुची स्वाभाविकच भोग भोगणे आणि संग्रह करणे या विषयीच राहते. म्हणून साधक केव्हा परमात्मतत्त्वाला प्राप्त करू इच्छितो आणि कधी भोग तसेच संग्रहाला प्राप्त करू इच्छितो. त्याला जसा संग मिळतो त्यानुसार त्याच्या भावात परिवर्तन होत राहते. असे असूनही तो भोगांना शांतपणाने भोगू शकत नाही, कारण सत्संग इत्यादीचे संस्कार त्याच्या अंतःकरणात वैराग्य (भोगाविषयी अरुची) निर्माण करीत असतात. अशा प्रकारे साधकाच्या अंतःकरणात द्वन्द्व (भोग भोगू की साधन करू) चालू राहते. या द्वन्द्वावरच अहंभाव टिकत असतो. आपल्याला सांसारिक भोग आणि संग्रहामध्ये प्रवृत्त व्हावयाचेच नाही तर केवळ परमात्मतत्त्वालाच प्राप्त करावयाचे आहे—असा दृढ निश्चय झाल्यावर द्वन्द्व राहत नाही आणि अहंभाव परमात्मतत्त्वामध्ये विलीन होतो.

वास्तविक पाहिले तर संसाराचे महत्त्व अंतः करणात ठसलेले असल्यामुळेच द्वन्द्व राहत असते. भोग भोगत राहिल्याने, दुसऱ्याकडून सुखाची अपेक्षा केल्याने संसारातील प्राणी, पदार्थांचे महत्त्व अंतःकरणात असते. त्यांच्याकडून सुख घेण्याने ते महत्त्व वाढत जाते, ज्यामुळे त्यांना प्राप्त करण्याविषयीची रुची प्रबळ होते. ती रुची परमात्मप्राप्तीच्या उद्देशाला स्थिर आणि दृढ होऊ देत नाही. यामुळे साधकात द्वन्द्व कायम राहते. उद्देशाच्या दृढतेसाठी साधकांनी हा पक्का विचार केला पाहिजे की, कितीही सुख, आराम, भोग मिळाले तरी मला त्यांचा स्वीकारच करावयाचा नाही तर

* गीतेत आलेले "कर्मबन्धं प्रहास्यसि" (२।३९), "त्रायते महतो भयात्" (२।४०), "जहातीह उभे सुकृतदुष्कृते" (२।५०), "मोक्ष्यसेऽशुभात्" (४।१६, ९।१), "वृजिनं संतरिष्यसि" (४।३६), "नाप्नुवन्ति दुःखालयमशाश्वतम्" (८।१५), "शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्म-बन्धनैः" (९।२८), "मृत्युसंसारसागरात् समुद्धर्ता भवामि" (१२।७) इत्यादी पदे या ठिकाणी आलेल्या "बन्धात्प्रमुच्यते" पदाचेच पर्यायवाची आहेत.

परहितासाठी त्याचा त्याग करावयाचा आहे असा विचार जितका दृढ होईल तितकाच साधक निर्द्वन्द्व होईल.

निर्द्वन्द्व होण्याविषयीचे प्रमुख विवेचन याच श्लोकात **"न द्वेष्टि न काङ्क्षति"** या पदाने केले गेले आहे, ज्याचे तात्पर्य राग-द्वेषरहित होणे हे आहे. राग-द्वेष नष्ट करण्यासाठी हा विचार केला पाहिजे की, आपली इच्छा नसतानाही अनुकूलता आणि प्रतिकूलता येतच असते अर्थात् आपण इच्छा केल्याने अनुकूलता प्राप्त होते असे नाही आणि इच्छा न केल्याने प्रतिकूलता प्राप्त होणार नाही, असेही नाही, अनुकूलता-प्रतिकूलता तर प्रारब्धाच्या फलरूपाने येत-जात राहतात, मग यांच्या येण्या-जाण्याविषयीची इच्छा कशाला करायची? अनुकूलतेविषयी आसक्ती आणि प्रतिकूलते-विषयी द्वेष आपल्या अज्ञानाने होत असतो. अशा प्रकारे विचार केल्याने अज्ञान नाहीसे होऊन राग-द्वेष संपूर्णपणे समाप्त होतात.

दुसरी गोष्ट अशी आहे की, आपली (स्वची) सत्ता स्वतंत्र आहे, एखाद्या पदार्थ, व्यक्ती, क्रियाच्या अधीन नाही. कारण सुषुप्ती-अवस्थेत जेव्हा आपण संसाराला विसरतो तेव्हाही आपली सत्ता कायम राहते. जागृत आणि स्वप्न अवस्थेमध्येही आपण प्राणी पदार्थाशिवाय राहू शकतो. मग (आपली स्वतंत्र सत्ता असतानाही) त्यात राग-द्वेष करून आपण त्यांच्या अधीन का व्हावे? अशा प्रकारे विचार केल्यानेही राग-द्वेष नष्ट होतात.

संसाराची आसक्ती उत्पन्न आणि नष्ट होणारी आहे. ही आसक्ती कधी स्थायी राहत नसते. परंतु आपण नवीन नवीन प्राणी-पदार्थ ह्याविषयी आसक्ती करून त्यांना कायम ठेवण्याचा प्रयत्न करत असतो. परंतु परमात्म्याची अभिलाषा उत्पन्न आणि नष्ट होणारी नाही. कारण परमात्म्याचाच अंश असल्याच्या नात्याने जीवाचा परमात्म्याशी अखंड संबंध आहे. परमात्म्याची अभिलाषा कधी कमी अथवा जास्तही होत नाही. केवळ संसारात आसक्ती अधिक झाल्यावर ती कमी होत असलेली आणि आसक्ती कमी झाल्यावर ती वाढत असलेली दिसून येते. म्हणून "मी सदा जिवंत रहावे, मला सर्व प्रकारचे ज्ञान प्राप्त व्हावे, मी सदा सुखी असावे" या रूपाने सत्-चित्-आनंदस्वरूप परमात्म्याची अभिलाषा संपूर्ण जीवाच्या ठिकाणी निरंतर राहत असते. जेव्हा संसाराची आसक्ती नष्ट होते आणि केवळ परमात्म्याची अभिलाषा शिल्लक राहते तेव्हा द्वन्द्व राहत नाही.

कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—तिन्हीही योग-मार्गात निर्द्वन्द्व होणे अत्यंत आवश्यक आहे. जोपर्यंत द्वन्द्व आहे तोपर्यंत मुक्ती मिळत नाही. (७।२७) परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीत राग आणि द्वेष हे दोन शत्रू आहेत (३।३४) द्वन्द्वरहित झाल्याने हे दोन्ही नष्ट होतात आणि यांच्या नष्ट झाल्याने सुखाने परमात्मतत्त्वाची प्राप्ती होते.

राग आणि द्वेष हीच संसारात अडकून पडण्याची दोन कारणे आहेत. जितकी साधने आहेत ती सर्व राग-द्वेष नष्ट करण्यासाठीच आहेत*. राग-द्वेष नष्ट झाल्यावर नित्यप्राप्त परमात्मतत्त्वाची अनुभूती स्वतःसिद्ध आहे. यात परिश्रम मुळीच नाहीत. कारण परमात्मतत्त्वाची अनुभूती असत्कडून होत नाही तर असत्च्या त्यागाने होत असते. असत्ची सत्ता राग-द्वेषावरच अवलंबून आहे. असत् संसार तर आपोआपच नष्ट होत आहे परंतु आपण आपल्या ठिकाणी राग-द्वेषाला पकडून ठेवल्याने संसार स्थिर असलेला दिसत असतो. म्हणून जो संसार निरंतर नष्ट होऊ लागला आहे त्याविषयी राग-द्वेष न राहिल्यास मुक्ती होणार नाही तर काय होईल ? म्हणून द्वन्द्वरहित अर्थात् राग-द्वेषरहित पुरुष सुखाने संसार बंधनातून मुक्त होतो.

**परिशिष्ट भाव—**बाह्य सुख दुःखात (सुखदायक-दुःखदायक परिस्थितीत) सम आणि अंतर सुख-दुःखरहित होणे 'निर्द्वन्द्व' अर्थात् द्वन्द्वरहित होणे होय.

तादात्म्यात चेतन-अंशाच्या प्रधानतेने 'जिज्ञासा' राहते आणि जड-अंशाच्या प्रधानतेने 'कामना' राहते. मनुष्यात भूक तर अविनाशी-तत्त्वाची राहते, परंतु आवड नाशवानाची राहते, कारण अविनाशीची भूक तो नाशवान् द्वारा शमन करू इच्छितो. भूक आणि आवड याचे हे द्वन्द्व मनुष्याच्या संसार-बंधनाला दृढ करते. जेव्हा मनुष्याचा संसारात राग-द्वेष राहत नाही, तेव्हा त्याची जिज्ञासापूर्ती होते आणि कामना समाप्त होते अर्थात् तो निर्द्वन्द्व होतो.

***संबंध**—या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकाच्या पूर्वार्धात भगवंतांनी ज्ञानयोग आणि कर्मयोग हे दोन्हीही परम कल्याण करणारे असल्याचे सांगितले. त्याचे स्पष्टीकरण आता पुढील दोन श्लोकांत करीत आहेत.*

---

* एतावानेव योगेन समग्रेणेह योगिनः। युज्यतेऽभिमतो ह्यर्थो यदसङ्गस्तु कृत्स्नशः॥ (श्रीमद्भा० ३।३२।२७)
योगीलोकांच्या संपूर्ण योग-साधनांचे, संपूर्ण संसाराविषयी आसक्तीचा अभाव होणे एकमात्र अभीष्ट फल आहे.

**साङ्ख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम्॥ ४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **बालाः** | = बेसमज लोक | **पण्डिताः** | = पंडितलोक | **आस्थिताः** | = स्थित असलेला (मनुष्य) |
| **साङ्ख्ययोगौ** | = सांख्ययोग आणि कर्मयोग यांना | **न** | = असे म्हणत नाहीत (कारण) | **उभयोः** | = दोन्हीचे |
| **पृथक्** | = वेग-वेगळे (फल देणारे) | **एकम्, अपि** | = (या दोन्हीपैकी) एका साधनेतही | **फलम्** | = फलरूप (परमात्म्याला) |
| **प्रवदन्ति** | = म्हणतात, (परंतु) | **सम्यक्** | = उत्तमप्रकारे | **विन्दते** | = प्राप्त करतो. |

*व्याख्या*— **साङ्ख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः**—याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात अर्जुनाने कर्माचा स्वरूपाने त्याग करून तत्त्वदर्शी महापुरुषाजवळ जाऊन ज्ञानप्राप्त करण्याच्या साधनेला "**कर्मसंन्यास**" म्हटले आहे. भगवंतांनीही दुसऱ्या श्लोकात आपल्या सिद्धांताचे प्राधान्य ठेवून त्याला "**संन्यास**" आणि "**कर्मसंन्यास**" नावाने म्हटले आहे. आता त्या साधनेला भगवान् या ठिकाणी "**साङ्ख्य**" या नावाने संबोधतात. भगवान् शरीर-शरीरीच्या भेदाचा विचार करून स्वरूपामध्ये स्थित होण्याला "**साङ्ख्य**" म्हणतात. भगवंताच्या मतात '**संन्यास**' आणि '**साङ्ख्य**' पर्यायवाची शब्द आहेत. ज्यात कर्माचा स्वरूपाने त्याग करण्याची आवश्यकता नाही.

अर्जुन ज्याला "**कर्मसंन्यास**" नावाने म्हणत आहेत तोही निःसंदेह भगवंतांनी सांगितलेल्या "**साङ्ख्य**" चाच एक अवांतर भेद आहे कारण गुरूंच्या मुखातून ऐकूनही साधक शरीर-शरीरीच्या भेदाचाच विचार करत असतो.

**बालाः**—या पदाने भगवान् हे म्हणत आहेत की, आयू आणि बुद्धीत श्रेष्ठ असूनही जे सांख्ययोग आणि कर्मयोग यांना वेगवेगळे फल देणारे मानतात ते बालक अर्थात् अज्ञानीच आहेत.

ज्या महापुरुषांनी सांख्ययोग आणि कर्मयोगाच्या तत्त्वाला योग्य प्रकारे समजून घेतले आहे तेच पण्डित अर्थात् बुद्धिमान आहेत. ते लोक दोन्हींना वेगवेगळे फल देणारे म्हणत नाहीत. कारण ते, दोन्ही साधनांच्या प्रणालींना न पाहता, त्या दोन्हींच्या वास्तविक परिणामाला पाहतात.

साधन प्रणालींचा विचार करून स्वतः भगवंतांनी तीसऱ्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात सांख्ययोग आणि कर्मयोग यांना दोन प्रकारची साधने स्वीकार केले आहे. दोन्हींची साधन-प्रणाली तर वेगवेगळी आहे परंतु साध्य वेगवेगळे नाही.

**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम्**—गीतेत अनेक ठिकाणी सांख्ययोग आणि कर्मयोगाचे परमात्मप्राप्ती-रूपी फल एकच सांगितले गेले आहे. तेराव्या अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकात दोन्ही साधनांनी, आपणाला आपल्या ठिकाणी परमात्मतत्त्वाचा अनुभव होतो हे सांगितले गेले आहे. तीसऱ्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात कर्मयोग्याला परमात्म्याची प्राप्ती होते असे सांगितले गेले आहे आणि बाराव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात तसेच तेराव्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात ज्ञानयोग्याला परमात्म्याची प्राप्ती होते असे सांगितले गेले आहे. अशा प्रकारे भगवंताच्या मताने दोन्हीही साधने एकच फल देणारी आहेत.

**परिशिष्ट भाव**—जो अन्य शास्त्रीय विचारांना तर जाणतो, परंतु सांख्ययोग आणि कर्मयोग यांच्या तत्त्वाला सखोल जाणत नाही, तो वास्तविक बालक अर्थात् बेसमज आहे.

संपूर्ण गीतेत अविनाशी तत्त्वासाठी 'फल' शब्द याच श्लोकात आला आहे. 'फल' शब्दाचा अर्थ आहे—परिणाम. कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्ही साधनांनी प्राप्त होणारे तत्त्व याला 'फल' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, या दोन्ही साधनांत मनुष्याचा स्वतःचा प्रयत्न मुख्य आहे. ज्ञानयोगात विवेकरूप प्रयत्न मुख्य आहे आणि कर्मयोगात परहिताची क्रियारूप प्रयत्न मुख्य आहे. साधकाचा स्वतःचा प्रयत्न, परिश्रम सफल झाला, म्हणून याला 'फल' म्हटले गेले आहे. हे फल नाशवान् नाही. कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्हींचे फल आत्मज्ञान अथवा ब्रह्मज्ञान आहे.

कर्तव्यकर्म करणे कर्मयोग आहे आणि काहीही न करणे ज्ञानयोग आहे. काहीही न करण्याने ज्या तत्त्वाची प्राप्ती होते, त्याच तत्त्वाची प्राप्ती कर्तव्यकर्म केल्याने होते. 'करणे' आणि 'न करणे' या तर साधना आहेत आणि यापासून ज्या तत्त्वाची प्राप्ती होते, ते साध्य आहे.

**यत्साङ्ख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते।**
**एकं साङ्ख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति॥ ५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **साङ्ख्यैः** | = सांख्ययोगींद्वारा | **तत्** | = तेच | **योगम्** | = कर्मयोग यांना (फलरूपात) |
| **यत्** | = जे | **गम्यते** | = प्राप्त केले जाते. (म्हणून) | **एकम्** | = एक |
| **स्थानम्** | = तत्त्व | **यः** | = जो मनुष्य | **पश्यति** | = पाहतो, |
| **प्राप्यते** | = प्राप्त केले जाते, | **साङ्ख्यम्** | = सांख्ययोग | **सः, च** | = तोच (योग्य) |
| **योगैः अपि** | = कर्मयोगींद्वाराही | **च** | = आणि | **पश्यति** | = पाहते. |

*व्याख्या*— **यत्साङ्ख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते**—पूर्व श्लोकाच्या उत्तरार्धात भगवंतांनी म्हटले होते की, एका साधनेतही चांगल्या प्रकारे स्थित होऊन मनुष्य दोन्ही साधनांच्या फलरूपी परमात्मतत्त्वाला प्राप्त करून घेतो. त्याच गोष्टीचे समर्थन भगवान् उपर्युक्त पदातून वेगळ्या अर्थाने करीत आहेत की, जे तत्त्व सांख्ययोगी प्राप्त करतो, तेच तत्त्व कर्मयोगीही प्राप्त करतो.

संसारामध्ये अशी एक समजूत झाली आहे की, कल्याण तर ज्ञानयोगानेच होते, कर्मयोगाने कल्याण होत नाही. ही समजूत नाहीशी करण्यासाठी येथे "**अपि**" अव्ययाचा प्रयोग केला गेला आहे.

सांख्ययोगी आणि कर्मयोगी—या दोघांचाही शेवटच्या क्षणी कर्माशी अर्थात् क्रियाशील प्रकृतीशी संबंध-विच्छेद होतो. प्रकृतीशी संबंध-विच्छेद झाल्यावर दोन्हीही योग एक होतात. साधनकालातही सांख्ययोगाचा विवेक (जड-चेतनाचा संबंध-विच्छेद) कर्मयोग्याला स्वीकारावा लागतो आणि कर्मयोगाची प्रणाली (आपल्यासाठी कर्म न करण्याची पद्धत) सांख्ययोग्याला स्वीकारावी लागते. सांख्ययोगाचा विवेक प्रकृती-पुरुषाचा संबंध-विच्छेद करण्यासाठी असतो आणि कर्मयोगाचे कर्म संसाराच्या सेवेसाठी असते. सिद्ध झाल्यावर सांख्ययोगी आणि कर्मयोगी दोन्हींची एक स्थिती होत असते कारण दोन्हीही साधकांच्या आपापल्या निष्ठा असतात. (३।३)

संसार विषम आहे. अत्यंत घनिष्ठ सांसारिक संबंधामध्येही विषमता राहत असते. परंतु परमात्मा सम आहेत. म्हणून समरूपी परमात्म्याची प्राप्ती संसाराशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यावरच होत असते. संसाराशी संबंध-विच्छेद करण्यासाठी दोन योगमार्ग आहेत. कर्मयोग आणि ज्ञानयोग. माझ्या सत् स्वरूपाचा कधीही अभाव होत नाही परंतु कामना, आसक्ती अभावातच उत्पन्न होत असते—असे समजून असंग होणे—हाच ज्ञानयोग आहे. ज्या वस्तूमध्ये साधकाची आसक्ती आहे, त्या वस्तूंना दुसऱ्याच्या सेवतेच उपयोगात आणणे आणि ज्या व्यक्तीमध्ये आसक्ती आहे त्यांची नि:स्वार्थभावनेने सेवा करणे हाच कर्मयोग आहे. अशा प्रकारे ज्ञानयोगात विवेक विचारद्वारा आणि कर्मयोगात सेवाद्वारा संसाराशी संबंध-विच्छेद होतो.

**एकं साङ्ख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति**—पूर्व श्लोकाच्या पूर्वार्धात भगवंतांनी व्यतिरेक पद्धतीने म्हटले होते की, सांख्ययोग आणि कर्मयोग यांना अज्ञानी लोकच वेगवेगळे फल देणारे म्हणतात. त्याच विषयाला आता अन्वय पद्धतीने म्हणत आहेत की, जो मनुष्य या दोन्ही साधनांना फलदृष्टीने एक पाहतो, त्याची दृष्टी यथार्थ आहे.

अशाप्रकारे चौथ्या आणि पाचव्या श्लोकाचा सार असा आहे की, भगवान् सांख्ययोग आणि कर्मयोग दोन्हींना स्वतंत्र साधने मानतात आणि दोन्हींचे फल एकच परमात्म-तत्त्वाची प्राप्ती मानतात. या वास्तविकतेला न जाणणाऱ्या मनुष्यांना भगवान् अज्ञानी म्हणत आहेत आणि जाणणाऱ्यांना यथार्थ जाणणारे (बुद्धिमान्) म्हणत आहेत.

**विशेष गोष्ट**

कोणत्याही साधनाची पूर्णता झाल्यावर जगण्याची इच्छा, मरण्याचे भय, मिळविण्याचा लोभ आणि करण्या-विषयीची आसक्ती ह्या चारही गोष्टी संपूर्णपणे नष्ट होतात.

जो नित्य मरतच आहे अर्थात् ज्याचा निरंतर अभाव होत आहे त्या शरीराविषयी मरण्याची भिती असू शकत नाही आणि जे नित्य निरंतर राहणारे आहे त्या स्वरूपाला जगण्याची इच्छा असू शकत नाही. तर मग जगण्याची इच्छा आणि मरण्याची भिती कोणाला असते? जेव्हा स्वरूप शरीराशी तादात्म्य करते, तेव्हाच त्याला जगण्याची इच्छा आणि मरण्याची भिती उत्पन्न होत असते. जगण्याची इच्छा आणि मरण्याची भिती ही दोन्हीही "ज्ञानयोगा" ने (विवेक द्वारा) नष्ट होतात.

मिळविण्याची इच्छा त्यालाच होते ज्याचे ठिकाणी

एखाद्या गोष्टीचा अभाव असतो. आपले स्वरूप भावरूप आहे, त्याचा कधीही अभाव होऊ शकत नाही. म्हणून स्वरूपाला कधीही मिळविण्याची इच्छा होत नाही. मिळविण्याची इच्छा न राहिल्याने त्याला कधीही करण्याची आसक्ती निर्माण होत नाही. स्वयं भावरूप असूनही जेव्हा ते अभावरूपी शरीराशी तादात्म्य करते, तेव्हा त्याला आपल्यात अभाव प्रतीत होऊ लागतो, ज्यामुळे त्याला मिळविण्याची इच्छा उत्पन्न होते आणि मिळविण्याच्या इच्छेमुळे करण्याची आसक्ती उत्पन्न होते. मिळविण्याची इच्छा आणि करण्याची आसक्ती हे दोन्हीही "कर्मयोगा" ने नष्ट होतात.

ज्ञानयोग आणि कर्मयोग या दोन साधनांपैकी कोणत्याही एका साधनाची पूर्णता झाल्यावर जगण्याची इच्छा, मरण्याची भिती, मिळविण्याचा लोभ आणि करण्याची आसक्ती—ह्या चारही गोष्टी संपूर्णपणे नष्ट होतात.

**परिशिष्ट भाव**—सांख्ययोग आणि कर्मयोग—दोन्ही साधन लौकिक असल्यामुळे एकच आहेत. सांख्ययोगात साधक चिन्मयतेत स्थित असतो आणि चिन्मयतेत स्थिती झाल्यास जडतेचा त्याग होतो. कर्मयोगात साधक जडतेचा त्याग करतो आणि जडतेचा त्याग झाल्यास चिन्मयतेत स्थिती होते. अशाप्रकारे सांख्ययोग आणि कर्मयोग—दोन्हीही साधनांच्या परिणामी चिन्मयतेची प्राप्ती अर्थात् चिन्मयस्वरूपात स्थितीचा अनुभव होतो.

शरीर संसाराच्या सेवेत लावणे कर्मयोग आहे आणि शरीरापासून स्वयं वेगळे होणे ज्ञानयोग आहे. शरीर संसाराच्या सेवेत लावा अथवा शरीरापासून वेगळे व्हा—दोन्हींचा परिणाम एकच होईल अर्थात् दोन्हीही साधनांनी संसाराशी संबंध-विच्छेद होऊन स्वरूपात स्थिती होईल.

येथे चौथ्या-पाचव्या श्लोकांत चौथ्या श्लोकाच्या पूर्वार्धाचा संबंध पाचव्या श्लोकाच्या उत्तरार्धाशी आहे आणि पाचव्या श्लोकाच्या पूर्वार्धाचा संबंध चौथ्या श्लोकाच्या उत्तरार्धाशी आहे.

कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—या तीन साधनांपैकी ज्ञानयोग आणि भक्तियोग यांचा प्रचार तर अधिक आहे, परंतु कर्मयोगाचा प्रचार फार कमी आहे. भगवंतानेही गीतेत म्हटले आहे की, 'फार काळ लोटल्यामुळे हा कर्मयोग या मनुष्यलोकांत लुप्तप्राय झाला आहे' (४ । २). म्हणून कर्मयोगाच्या संबंधात अशी धारणा झाली आहे की, हे परमात्मप्राप्तीचे स्वतंत्र साधन नाही. म्हणून कर्मयोगाचा साधक एक तर ज्ञानयोगाचा मार्ग स्वीकारतो अथवा भक्तियोगाचा. जसे—

**तावत् कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता । मत्कथाश्रवणादौ वा श्रद्धा यावन्न जायते ॥**

(श्रीमद्भा० ११ । २० । ९)

'तोपर्यंत कर्म करावे, जोपर्यंत भोगापासून वैराग्य झाले नाही (ज्ञानयोगाचा अधिकारी झाला नाही) अथवा माझ्या लीला-कथा श्रवणादीत श्रद्धा झाली नाही (भक्तियोगाचा झाला नाही.)'।

परंतु येथे भगवान् ज्ञानयोगासारखे कर्मयोगालाही परमात्मप्राप्तीचे स्वतंत्र साधन सांगत आहेत. उपर्युक्त चौथ्या-पाचव्या श्लोकाशिवाय गीतेत अनेक ठिकाणी कर्मयोगद्वारा स्वतंत्रतापूर्वक तत्त्वज्ञान, परमशांती, मुक्ती अथवा परमात्मतत्त्वाची प्राप्ती होण्याचा विषय आला आहे. जसे—'**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति**' (४ । ३८), '**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म नचिरेणाधि गच्छति**' (५ । ६), '**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते**' (४ । २३), '**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः**' (४ । १९), '**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम्**' (५ । १२) श्रीमद्भागवतातसुद्धा कर्मयोग परमात्मप्राप्तीचे स्वतंत्र साधन सांगितले आहे—

**स्वधर्मस्थो यजन् यज्ञैरनाशीः काम उद्धव । न याति स्वर्ग नरकौ यद्यन्यन्न समाचरेत् ॥**

(११ । २० । १०)

'जो स्वधर्मात स्थित राहून आणि भोगांच्या कामनेचा त्याग करून आपल्या कर्तव्यकर्माद्वारा भगवंताचे पूजन करतो तसेच सकामभावपूर्वक कोणतेही कर्म करीत नाही, त्याला स्वर्ग अथवा नरकात जावे लागत नाही अर्थात् तो कर्मबंधनातून मुक्त होतो.'

**अस्मिंल्लोके वर्तमानः स्वधर्मस्थोऽनघः शुचिः । ज्ञानं विशुद्धमाप्नोति मद्भक्तिं वा यदृच्छया ॥**

(११ । २० । ११)

'स्वधर्मात स्थित असलेला तो कर्मयोगी या लोक सर्व कर्तव्यकर्मांचे आचरण करूनही पाप-पुण्यापासून मुक्त होऊन परिश्रमाविना तत्त्वज्ञान अथवा परमप्रेम (पराभक्ती) प्राप्त करतो.'

तात्पर्य हे निघाले की, कर्मयोग साधकाला ज्ञानयोग अथवा भक्तियोगाचा अधिकारी बनवितो आणि स्वतंत्रतेने कल्याणही करतो. दुसऱ्या शब्दात कर्मयोगाने साधन-ज्ञान अथवा साधन-भक्तीची प्राप्तीही होऊ शकते. तसेच साध्य-ज्ञान (तत्त्वज्ञान) अथवा साध्यभक्ती (परमप्रेम अथवा पराभक्ती) याचीही प्राप्ती होऊ शकते.

*संबंध—याच अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात भगवंतांनी संन्यासा (सांख्ययोग) पेक्षा कर्मयोगाला श्रेष्ठ सांगितले. आता तीच गोष्ट दुसऱ्या प्रकाराने सांगत आहेत.*

**सन्न्यासस्तु* महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म नचिरेणाधिगच्छति॥ ६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **आप्तुम्** | = सिद्ध होणे | **नचिरेण** | = तात्काळ |
| **महाबाहो** | = हे महाबाहो! | **दुःखम्** | = कठीण आहे. | **ब्रह्म** | = ब्रह्माला |
| **अयोगतः** | = कर्मयोगाविना | **मुनिः** | = मननशील | **अधिगच्छति** | = प्राप्त होतो. |
| **सन्न्यासः** | = सांख्ययोग | **योगयुक्तः** | = कर्मयोगी | | |

*व्याख्या*— **सन्न्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः**—सांख्ययोगाच्या सफलतेसाठी कर्मयोगाचे साधन करणे आवश्यक असते. कारण त्याशिवाय सांख्ययोगाची सिद्धी होणे अत्यंत अवघड जाते. परंतु कर्मयोगाच्या सिद्धीसाठी सांख्ययोगाचे साधन करण्याची आवश्यकता नाही. हाच भाव "**तु**" पदाने प्रगट केला गेला आहे.

सांख्ययोग्याचा उद्देश परमात्मतत्त्वाचा अनुभव करणे हा असतो. परंतु आसक्ती असल्यास या साधनेद्वारा परमात्मतत्त्वाच्या अनुभवाची तर गोष्टच सोडा, हे साधन समजणेच कठीण आहे.

कर्मयोगाचे अनुष्ठान करणे हा आसक्ती नष्ट करण्याचा सोपा उपाय आहे. कर्मयोगात प्रत्येक क्रिया दुसऱ्यांच्या हितासाठीच केली जाते. दुसऱ्यांच्या हिताचा भाव राहिल्याने आपली आसक्ती आपोआप समाप्त होते. म्हणून कर्मयोगाच्या आचरणाने आसक्ती नष्ट करून सांख्ययोगाचे साधन करणे सोपे जाते. कर्मयोगाचे साधन केल्याशिवाय सांख्ययोगाची सिद्धी होणे कठीण आहे.

**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म नचिरेणाधिगच्छति**— आपल्या निष्कामभावाचे आणि दुसऱ्याच्या हिताचे मनन करणाऱ्या कर्मयोग्याला या ठिकाणी "**मुनिः**" म्हटले गेले आहे.

कर्मयोगी मोठी अथवा लहान, प्रत्येक क्रिया करताना आपला भाव सकाम आहे का निष्काम आहे याची नेहमी जाणीव ठेवतो. सकामभाव निर्माण झाल्यास त्याला समाप्त करून टाकतो. कारण सकामभाव आल्याने ती क्रिया आपली आणि आपल्यासाठी होत असते.

दुसऱ्याचे हित कसे होईल? अशा प्रकारे निरंतर चिंतन केल्यास आसक्तीचा त्याग सुगमतेने होतो.

उपर्युक्त पदांतून भगवान् कर्मयोगाचे वैशिष्ट्य सांगत आहेत की, कर्मयोगी तात्काळ परमात्मतत्त्वाला प्राप्त करून घेतो. परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीत संसाराची आसक्तीच विलंबाला कारणीभूत होत असते. निष्कामभावनेने केवळ दुसऱ्यांच्या हितासाठी कर्म करत राहिल्याने कर्मयोग्याच्या आसक्तीचा संपूर्णपणे अभाव होत असतो आणि आसक्तीचा संपूर्णपणे अभाव झाल्याने स्वतःसिद्ध परमात्म्याची अनुभूती होते. हाच आशय भगवंतांनी चौथ्या अध्यायाच्या अडतीसाव्या श्लोकात "**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति**" या पदांतून सांगितला आहे की, योगसंसिद्ध झाल्याबरोबर आपोआप तत्त्वज्ञानाची प्राप्ती अवश्य होते. या साधनाला दुसऱ्या साधनेची अपेक्षा नसते. याची सिद्धी होण्यात काठिण्य आणि विलंबही होत नाही.

दुसरे कारण असे आहे की, देहधारी-देहाभिमानी मनुष्य संपूर्ण कर्मांचा त्याग करू शकत नाही, परंतु जो कर्मफलाचा त्यागी आहे, तो त्यागी म्हणविला जातो. (१८। ११) यातून असा ध्वनी निघतो की, देहधारी कर्मांचा त्याग तर करू शकत नाही, परंतु कर्मफलाचा-फलेच्छेचा त्याग तर करूच शकतो. म्हणून कर्मयोग सोपा आहे.

कर्मयोगाचे माहात्म्य सांगताना भगवान् म्हणतात की, कर्मयोग्याला तात्काळ शांती प्राप्त होत असते, "**त्यागाच्छान्तिरनंतरम्**" (१२। १२) तो संसारबंधनातून सुखाने मुक्त होतो, "**सुखं बन्धात्प्रमुच्यते**" (५। ३) म्हणून कर्मयोगाचे साधन सुगम, तात्काळ सिद्धी प्राप्त करून देणारे आणि इतर कोणत्याही साधनाच्या साहाय्याशिवाय परमात्मप्राप्ती करून देणारे स्वतंत्र साधन आहे.

*संबंध—आता भगवान् कर्मयोग्याच्या लक्षणाचे वर्णन करीत आहेत.*

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेन्द्रियः।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते॥ ७॥**

---

* जरी या ठिकाणी "संन्यास" पद "आप्तुम्" क्रियेचे कर्म असल्यामुळे त्यात द्वितीया पाहिजे होती, तरीपण "तु" पदाला निपात संज्ञा मानून त्यापासून कर्म उक्त झाल्याने "संन्यास" पदात प्रथमा झाली आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **जितेन्द्रियः** | = ज्याची इन्द्रिये वश झाली आहेत, | | आपल्या ताब्यात आहे (आणि) | | मानतो, (असा) |
| **विशुद्धात्मा** | = ज्याचे अंत:करण निर्मळ आहे, | **सर्वभूतात्म-भूतात्मा** | = संपूर्ण प्राण्यांच्या आत्म्यालाच आपला आत्मा | **योगयुक्तः** | = कर्मयोगी |
| **विजितात्मा** | = ज्याचे शरीर | | | **कुर्वन्** | = (कर्म) |
| | | | | **अपि** | करूनही |
| | | | | **न, लिप्यते** | = लिप्त होत नाही. |

*व्याख्या*— **जितेन्द्रियः**—इन्द्रियांचे राग-द्वेषरहित होणे म्हणजेच इन्द्रिये वशमध्ये होणे आहे. राग-द्वेषरहित झाल्यावर इन्द्रियांमध्ये मनाला विचलित करण्याची शक्ती राहत नाही.* साधक आपल्या मनाप्रमाणे त्यांना वाटेल त्या ठिकाणी प्रवृत्त करू शकतो.

कर्मयोगाच्या साधकासाठी इन्द्रियांचे वशमध्ये असणे आवश्यक आहे. म्हणूनच भगवान् कर्मयोगाच्या प्रकरणात इन्द्रियांना वश करण्याविषयी विशेषरूपाने सांगत आहेत. जसे "**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्य**" (३।७), "**तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य**" (३।४१). कर्मयोग्याचा कर्माशी अधिक संबंध राहत असतो, म्हणून इन्द्रिये वशमध्ये न झाल्यास त्याची विचलित होण्याची शक्यता राहते. कर्मयोगाच्या साधनात दुसऱ्यांच्या हितासाठी सेवारूपाने कर्तव्यकर्म करणे आवश्यक आहे, ज्यासाठी इन्द्रियांचे वशमध्ये असणे अत्यंत जरूरी आहे. इन्द्रिये वशमध्ये झाल्याशिवाय कर्मयोगाचे साधन होणे कठीण आहे.

**विशुद्धात्मा**—सांसारिक पदार्थांचे महत्त्वच अंत:-करणाच्या मलिनतेला कारण आहे. जेथे पदार्थांचे महत्त्व असते तेथेच त्यांच्या कामना राहत असतात. साधक निष्काम तेव्हाच होतो जेव्हा त्याच्या अंत:करणात सांसारिक पदार्थांचे महत्त्व राहत नाही. जोपर्यंत पदार्थांचे महत्त्व आहे तोपर्यंत तो निष्काम होऊ शकत नाही.

केवळ परमात्मप्राप्तीचा उद्देश अंत:करणात दृढ झाल्यावर अंत:करणाची जशी आणि जितक्या लवकर शुद्धी होते, तितकी लवकर आणि तशी अंत:करणाची शुद्धी इतर कोणत्याही अनुष्ठानाने होत नाही. म्हणून कर्मयोगात केवळ एक उद्देश होण्याचे जितके माहात्म्य आहे, तितके इतर कशाचे नाही.

**विजितात्मा**—कर्मयोगात शरीराच्या सुख-आरामाचा त्याग करण्याची अत्यंत आवश्यकता आहे. जर शरीरात आळस, प्रमाद असेल, तर कर्मयोगाचे अनुष्ठान होऊ शकणार नाही. म्हणून येथे भगवंतांनी शरीराला वश करण्यास सांगितले आहे.

**सर्वभूतात्मभूतात्मा**—कर्मयोग्याला संपूर्ण प्राण्याशी आपल्या ऐक्याचा अनुभव होतो.† जसे शरीराच्या एखाद्या अवयवाला दुखापत झाल्यास दुसरे अवयव त्याची सेवा करण्यासाठी सहज रीतीने, कोणताही अभिमान न करता, कृतज्ञतेची अपेक्षा न ठेवता, आपोआप तयार होतात. तसेच कर्मयोग्याकडून दुसऱ्यांना सुख पोहचविण्याचा प्रयत्न सहज रीतीने, अभिमान किंवा कामनेशिवाय, कृतज्ञतेच्या अपेक्षे-शिवाय आपोआप होतो. तो सेवा करण्यासाठी कोणत्याही प्राण्यास आपल्याहून वेगळे समजत नाही, सर्वांना आपलेच अवयव समजतो.

जसे आपल्या शरीरात भिन्न-भिन्न अवयवाकडून वेग-वेगळे व्यवहार होत असले तरी, सर्व अवयवांशी आपलेपणा सारखाच (एकच) राहतो, तसेच कर्मयोग्याकडून मर्यादेनुसार संसारात यथायोग्य वेगवेगळे व्यवहार होत असले तरी सर्वांशी त्याचा आपलेपणा समानच राहतो.

आपली आसक्ती नष्ट करण्यासाठी "**सर्वभूतात्मभूतात्मा**" होणे अर्थात् संपूर्ण प्राण्यांशी आपले ऐक्य समजणे अत्यंत आवश्यक आहे. कर्मयोग्याचा स्वभाव उदारतेचा असतो. सर्वभूतात्मभूतात्मा झाल्याशिवाय उदारता येत नसते.

## विशेष गोष्ट

क्रिया आणि पदार्थाबरोबर आपण निरंतर राहू शकत नाही आणि ते आपल्याबरोबर निरंतर राहू शकत नाहीत. कारण असे आहे की, क्रिया आणि पदार्थांत निरंतर परिवर्तन होत असते, परंतु आपल्यात (स्वरूपात) कधीही परिवर्तन होत नाही. म्हणून क्रिया आणि पदार्थ निरंतर आपला त्याग करीत आहेत. आपण ही त्यांचा त्याग करूनच मुक्ती मिळवू शकतो, परमशांती मिळवू शकतो. त्यांच्याबरोबर राहून आपण मुक्ती, परमशांती मिळवू शकत नाही. कारण त्यांच्याबरोबर राहण्याचा आपला स्वभाव नाही आणि आपल्याबरोबर राहण्याचा त्यांचा स्वभाव नाही. म्हणून क्रिया आणि पदार्थांना दुसऱ्यांच्या सेवेमध्ये उपयोगात

* श्रुत्वा स्पृष्ट्वा च दृष्ट्वा च भुक्त्वा घ्रात्वा च यो नरः। न हृष्यति ग्लायति वा स विज्ञेयो जितेन्द्रियः॥ मनुस्मृति (२।९८)
जो पुरुष ऐकून, स्पर्श करून, पाहून, खाऊन आणि वास घेऊन प्रसन्न होत नाही किंवा उद्विग्न होत नाही, त्यालाच जितेन्द्रिय समजावे.

† मग आपल्या शरीराशी असंग होवो अथवा आपल्या शरीराप्रमाणे संपूर्ण प्राण्यांच्या शरीराशी ऐक्य समजो—दोन्हींचा परिणाम एकच होईल. ज्ञानयोगी आपल्या शरीरापासून असंग होतो आणि कर्मयोगी सर्व शरीराशी आपल्या शरीराचे ऐक्य मानतो. ऐक्य मानल्याने तो उदार होतो.

*व्याख्या*— **यतात्मानः**—नित्य सत्यतत्त्वाच्या प्राप्तीचा दृढ निश्चय असल्याने साधकांना शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी वश करावे लागत नाहीत. तर ते स्वाभाविकच सुगमतेने त्यांच्या वश होतात. वश होण्याला कारण यांचे ठिकाणी राग-द्वेषादी दोषांचा अभाव झालेला असतो आणि यांच्याद्वारे होणारी प्रत्येक क्रिया दुसऱ्यांचे हित करणारी होत असते.

शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी यांना आपले आणि आपल्यासाठी समजल्यानेच हे आपल्या वश राहत नाहीत. आणि यांचे ठिकाणी राग-द्वेष, काम-क्रोध इत्यादी दोष विद्यमान राहतात. हे दोष जोपर्यंत विद्यमान राहतात तोपर्यंत साधक स्वतः यांच्या वश राहतो. म्हणून साधकाने शरीरादींना कधीही आपले आणि आपल्यासाठी समजू नये. असे समजल्याने त्यांच्या ठिकाणी असलेला आग्रह समाप्त होतो आणि ते वश होऊन जातात. म्हणून ज्यांचा शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी यांत आपलेपणाचा भाव नसतो तसेच जे या शरीरादींना कधीही आपले स्वरूप समजत नाहीत, अशा सावधान साधकासाठी या ठिकाणी ''**यतात्मानः**'' पद आले आहे.

**सर्वभूतहिते रताः**—सांख्ययोगाच्या सिद्धीत व्यक्तित्वाचा अभिमान मुख्य बाधक आहे. या व्यक्तित्वाच्या अभिमानाला समाप्त करून, तत्त्वामध्ये आपल्या स्वाभाविक स्थितीचा अनुभव करण्यासाठी, संपूर्ण प्राण्यांच्या हिताचा भाव असणे आवश्यक आहे. संपूर्ण प्राण्यांच्या हिताविषयी असलेली प्रीतीच त्याच्या व्यक्तित्वाला समाप्त करण्याचे सुगम साधन आहे.

जे सर्वत्र परिपूर्ण परमात्मतत्त्वाशी अभिन्नतेचा अनुभव करू इच्छितात, त्यांच्यासाठी प्राणीमात्राच्या हिताविषयी प्रीती असणे आवश्यक आहे. जसे आपले म्हणविणाऱ्या शरीरात, आकृती, अवयव, कार्य, नाव इत्यादी भिन्न भिन्न असूनही असा भाव राहतो की, सर्व अंगांना आराम मिळावा, कोणत्याही अंगाला कष्ट होऊ नये, तसेच वर्ण, आश्रम, सांप्रदाय, साधन पद्धती इत्यादी भिन्न भिन्न असतानाही संपूर्ण प्राण्यांच्या हितामध्ये स्वाभाविकच रती असली पाहिजे की, सर्वांना सुख मिळावे, सर्वांचे हित व्हावे, कधीही कोणालाही किंचितही कष्ट होऊ नये. कारण बाहेरुन भिन्नता राहत असूनही एक परमात्मतत्त्वच समानरूपाने सर्वात परिपूर्ण आहे. म्हणून प्राणीमात्राच्या हितात प्रीती झाल्याने व्यक्तिगत स्वार्थभाव सुगमतेने नष्ट होत असतो आणि परमात्मतत्त्वाशी आपल्या अभिन्नतेचा अनुभव येतो.

**छिन्नद्वैधाः**—जोपर्यंत तत्त्वप्राप्तीचा एक निश्चय दृढ होत नाही तोपर्यंत चांगल्या चांगल्या साधकांच्या अंतः-करणातही काही ना काही द्विधा राहत असते. दृढ निश्चय झाल्यावर साधकांना आपल्या साधनेत कोणताही संशय, विकल्प, भ्रम इत्यादी राहत नाही आणि ते असंदिग्धरूपाने आपल्या साधनेत तत्परतेने लागतात.

**क्षीणकल्मषाः**—प्रकृतीशी जो काही मानलेला संबंध आहे तो सर्व दोषच आहे कारण प्रकृतीशी मानलेला संबंधच संपूर्ण कल्मष अर्थात् पाप, दोष, विकार यांचा हेतू आहे. प्रकृती तसेच तिचे कार्य—शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीशी स्पष्टपणे आपला वेगळा अनुभव करण्याने साधकात निर्विकारता आपोआप येत असते.

**ऋषयः**—''**ऋष्**'' धातूचा अर्थ ज्ञान आहे. त्या ज्ञानाला महत्त्व देणारे ऋषी म्हटले जातात. प्राचीन काळात ऋषींनी गृहस्थाश्रमामध्ये राहूनच परमात्मतत्त्वाला प्राप्त केले होते. या श्लोकातही सांसारिक व्यवहार करताना विवेकाने परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीसाठी साधन करणाऱ्या साधकांचे वर्णन आहे. म्हणून आपल्या विवेकाला महत्त्व देणारे हे साधकही, ऋषीच आहेत.

**लभन्ते ब्रह्मनिर्वाणम्**—ब्रह्म तर सदा सर्वांना प्राप्त आहेच, परंतु परिवर्तनशील शरीर इत्यादीशी आपले ऐक्य मानल्यामुळे मनुष्य ब्रह्मापासून विमुख राहतो. जेव्हा शरीरादी उत्पत्ति-विनाशशील वस्तूशी संबंध-विच्छेद होतो, तेव्हा संपूर्ण विकार आणि संशय हे नष्ट होऊन सर्वत्र परिपूर्ण ब्रह्माचा अनुभव होतो.

**लभन्ते**—या पदाचे तात्पर्य जशा लाटा समुद्रात लीन होतात, तसेच सांख्ययोगी निर्वाणब्रह्मात लीन होत असतो. जसे जलतत्त्वात समुद्र आणि लाटा हे दोन भेद नसतात, तसेच निर्वाणब्रह्मात आत्मा आणि परमात्मा हे दोन भेद नसतात.

**परिशिष्ट भाव**—लोकांच्या दृष्टीत ज्ञानयोगी दुसऱ्यांचे हित करीत असलेला (सर्वभूतहिते रताः) दिसतो, परंतु वास्तविक तो दुसऱ्यांचे हित करीत नाही, तर त्याच्याद्वारा स्वतः स्वाभाविक दुसऱ्यांचे हित होत असते.

***संबंध***— *चोवीसाव्या-पंचवीसाव्या श्लोकात भगवंतांनी सांख्ययोगाच्या साधनाद्वारा निर्वाणब्रह्माला प्राप्त करण्याविषयी सांगितले. आता पुढील श्लोकात हे सांगत आहेत की, निर्वाणब्रह्माची प्राप्ती झाल्यावर त्याचा कसा अनुभव येतो ?*

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम्।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम्॥ २६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कामक्रोध-** | = कामक्रोधापासून | | साक्षात्कार | | असताना |
| **वियुक्तानाम्** | = सर्वथारहित | | झालेल्या | | किंवा |
| **यतचेतसाम्** | = जिंकलेल्या | **यतीनाम्** | = सांख्ययोगींसाठी | | मृत्यूनंतर |
| | मनाचा (आणि) | **अभितः** | = सर्व बाजूंनी | **ब्रह्मनिर्वाणम्** | = निर्वाण ब्रह्म |
| **विदितात्मनाम्** | = स्वरूपाचा | | शरीर जिवंत | **वर्तते** | = परिपूर्ण असते. |

*व्याख्या*— **कामक्रोधवियुक्तानां यतीनाम्**—भगवान् उपर्युक्त पदाने हे स्पष्टपणे सांगत आहेत की, सिद्ध महापुरुषात काम-क्रोधादी दोषांचा गंधही राहत नाही. काम-क्रोधादी दोष उत्पत्ति-विनाशशील असत् पदार्था (शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी) च्या संबंधाने उत्पन्न होतात. सिद्ध महापुरुषास उत्पत्ति-विनाशरहित सत्-तत्त्वात आपल्या स्वाभाविक स्थितीचा अनुभव येत असतो, म्हणून उत्पत्ति-विनाशशील असत् पदार्थाशी त्याचा संबंध मुळीच राहत नाही. त्याच्या अनुभवात आपले म्हणविले जाणाऱ्या शरीर-अंत:करणासहित संपूर्ण संसाराशी आपल्या संबंधाचा संपूर्णपणे अभाव होत असतो, म्हणून त्याचे ठिकाणी काम-क्रोध इत्यादी विकार कसे उत्पन्न होऊ शकतात? जर काम-क्रोध सूक्ष्मरूपानेही असतील तर आपल्याला जीवन्मुक्त समजणे भ्रमच आहे.

उत्पत्ति-विनाशशील वस्तूंच्या इच्छेला "काम" म्हणतात. काम अर्थात् कामना अभावात उत्पन्न होते. अभाव नेहमी असत्‌मध्ये असतो. सत्‌स्वरूपात अभाव नाहीच. परंतु जेव्हा स्वरूप असत्‌शी तादात्म्य करते, तेव्हा असत्‌अंशाच्या अभावाला तो आपल्यात समजतो. आपल्यात अभाव मानल्यानेच कामना उत्पन्न होते आणि कामना पूर्तीत बाधा आली तर क्रोध उत्पन्न होतो. अशाप्रकारे स्वरूपात कामना नसतानाही तादात्म्यामुळे आपल्यात कामनेची प्रतीती येत असते. परंतु ज्यांचे तादात्म्य नष्ट झाले आहे आणि स्वरूपात स्वाभाविक स्थितीचा अनुभव झाला आहे त्यांना स्वत:मध्ये असत्‌च्या अभावाचा अनुभव कसा होऊ शकेल?

साधन केल्याने काम-क्रोध कमी होतात—असा साधकाचा अनुभव आहे. जी वस्तू कमी होणारी असते ती नष्ट होणारी असते, म्हणून ज्या साधनाने हे काम-क्रोध कमी होतात, त्याच साधनाने हे नष्टही होऊ शकतात.

साधन करणाऱ्यांना असा अनुभव येतो की, (१) काम-क्रोध इत्यादी दोष पूर्वी जितक्या लवकर येत होते, तितक्या लवकर आता येत नाहीत. (२) पूर्वी जेवढ्या वेगाने येत होते, तेवढ्या वेगाने आता येत नाहीत आणि (३) पूर्वी जितक्या वेळपर्यंत राहत होते, तितक्या वेळपर्यंत आता राहत नाहीत. कधी कधी साधकाला असाही अनुभव येतो की, काम-क्रोधाचा वेग पूर्वीपेक्षाही अधिक झाला आहे. याचे कारण असे आहे की, (१) साधन करण्याने भोगासक्ती तर नाहीशी होत गेली आणि पूर्णावस्था प्राप्त झाली नाही. (२) अंत:करण शुद्ध झाल्याने काम-क्रोध थोडे उत्पन्न झाले असूनही साधकाला अधिक प्रमाणात उत्पन्न झाल्याचे वाटतात. (३) एखादा मनाच्या विरुद्ध कार्य करतो तर त्याचे साधकाला वाईट वाटते, परंतु साधक त्याची पर्वा करीत नाही. वाईट वाटण्याच्या भावनेचा त्याच्या अंत:करणात संग्रह होत राहतो. मग शेवटी थोड्याशा गोष्टीहूनही अधिक प्रमाणात क्रोध येतो, कारण अंत:करणात जो संग्रह झाला होता तो एकदम बाहेर पडतो. याचे दुसऱ्या व्यक्तीलाही आश्चर्य वाटते की, एवढ्या साध्या गोष्टीबद्दल देखील या मनुष्याला इतका क्रोध कसा उत्पन्न झाला?

कधी कधी वृत्ती स्वस्थ असल्याने साधकाला असे वाटते की, मी पूर्णावस्थेला पोहचलो. परंतु वास्तविक जोपर्यंत पूर्णावस्थेचा अनुभव करणारा आहे, तोपर्यंत (व्यक्तित्व कायम राहिल्याने) पूर्णावस्था झाली नाही.

**यतचेतसाम्**—जोपर्यंत असत्‌चा संबंध राहतो, तोपर्यंत मन वश होत नाही. असत् संबंध संपूर्णपणे संपल्यावर महापुरुषांचे म्हणविले जाणारे मन, आपोआप वशमध्ये राहत असते.

**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम्**—आपल्या स्वरूपाचा वास्तविक बोध झाल्याने त्या महापुरुषांना या ठिकाणी "**विदितात्मनाम्**" म्हटले गेले आहे. तात्पर्य ज्या उद्देशाच्या प्राप्तीसाठी मनुष्यजन्म मिळाला आहे आणि मनुष्य-जन्माचे एवढे माहात्म्य सांगितले गेले आहे त्याला त्यांनी प्राप्त करून घेतेले आहे.

जिवंत असताना अथवा मृत्यूनंतर ते महापुरुष नित्य निरंतर शांत ब्रह्मातच स्थित असतात. जसे निरनिराळ्या क्रिया करतेवेळी सामान्य मनुष्याची शरीरात स्थितीची मान्यता निरंतर राहत असते, तसेच निरनिराळ्या क्रिया करतेवेळी त्या महापुरुषांची स्थिती निरंतर एका ब्रह्मातच राहत असते. त्यांच्या या स्वाभाविक स्थितीत कधीही थोडासुद्धा फरक राहत नाही. कारण ज्या विभागात क्रिया होतात त्या विभागाशी (असत्) त्यांचा कसलाच संबंध राहिलेला नसतो.

*संबंध—आता पुढील दोन श्लोकांत भगवान् हे सांगणार आहेत की, ज्या तत्त्वाला ज्ञानयोगी आणि कर्मयोगी प्राप्त करत असतो त्याच तत्त्वाला ध्यानयोगीही प्राप्त करू शकतो**

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ॥ २७॥**
**यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः॥ २८॥**

**बाह्यान्** = बाह्य
**स्पर्शान्** = पदार्थांना
**बहिः एव** = बाहेरच
**कृत्वा** = सोडून
**च** = आणि
**चक्षुः** = नेत्रांच्या दृष्टीला
**भ्रुवोः** = भुवयांच्या
**अन्तरे** = आत (स्थिर करून)
**नासाभ्यन्तर** = (तसेच)
**चारिणौ** नाकपुडीत विचरण करणाऱ्या
**प्राणापानौ** = प्राण आणि अपान वायूला
**समौ** = सम
**कृत्वा** = करून
**यतेन्द्रिय** = ज्याने
**मनोबुद्धिः** इंद्रिये, मन आणि बुद्धी आपल्या वश केली आहेत,
**यः** = जो
**मोक्षपरायणः** = (केवळ) मोक्षपरायण आहे (तसेच)
**विगतेच्छा-** = (जो)
**भयक्रोधः** सर्वथा इच्छा, भय आणि क्रोधरहित आहे
**सः** = तो
**मुनिः** = मुनी
**सदा** = सदा
**मुक्तः एव** = मुक्तच आहे

*व्याख्या*— **स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यान्**—परमात्म्या-शिवाय सर्व पदार्थ बाह्य आहेत. बाह्य पदार्थांना बाहेरच सोडून देण्याचे तात्पर्य मनाने बाह्य विषयाचे चिंतन न करणे हे आहे.

बाह्य पदार्थांच्या संबंधाचा त्याग कर्मयोगात सेवाद्वारा आणि ज्ञानयोगात विवेकद्वारा केला जातो. या ठिकाणी भगवान् ध्यानयोगाच्या द्वारा बाह्य पदार्थाशी संबंध-विच्छेदा-विषयी सांगत आहेत. ध्यानयोगात एकमात्र परमात्म्याचे चिंतन होत असल्याने बाह्य पदार्थाशी विमुखता होते.

वास्तविक बाह्य पदार्थ बाधक नाहीत, यांच्याशी आसक्तीने मानलेला आपला संबंध बाधक आहे. या मानलेल्या संबंधाचा त्याग करण्यातच उपर्युक्त पदाचे तात्पर्य आहे.

**चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः**—या ठिकाणी "**भ्रुवोः अन्तरे**" पदाने दृष्टीला दोन्ही भुवयाच्या आत ठेवणे अथवा दृष्टीला नाकाच्या अग्रभागावर ठेवणे (६।१३) हे दोन्हीही अर्थ घेतले जाऊ शकतात.

ध्यानकाळात डोळे पूर्णपणे बंद ठेवल्याने लयदोष अर्थात् निद्रा येण्याची शक्यता राहते आणि डोळे पूर्ण उघडे ठेवल्याने (समोर दृष्य राहिल्यामुळे) विक्षेपदोष येण्याची शक्यता राहते. या दोन्ही प्रकारच्या दोषांना दूर करण्यासाठी अर्धोन्मिलीत दृष्टीला दोन्ही भुवयांच्या मध्यभागी स्थिर करण्यास सांगितले गेले आहे.

**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ**—नाक-पुडीतून बाहेर निघणाऱ्या वायूला "प्राण" आणि नाक-पुडीतून आत जाणाऱ्या वायूला "अपान" म्हणतात.

प्राणवायूची गती दीर्घ आणि अपानवायूची गती लघू असते. या दोन्हींना सम करण्यासाठी प्रथम डाव्या नाक-पुडीतून अपानवायूला आत घेऊन उजव्या नाकपुडीतून प्राण-वायूला बाहेर काढावे. मग उजव्या नाकपुडीतून अपान-वायूला आत घेऊन डाव्या नाकपुडीतून प्राणवायूला बाहेर काढावे. या सर्व क्रियेत समय सारखा असला पाहिजे. अशा प्रकारे सतत अभ्यास करत राहिल्यास प्राण आणि अपान-वायूची गती सम, शांत आणि सूक्ष्म होत जाते. जेव्हा नाक-पुड्यांना बाहेर आणि आत तसेच कंठादी भागात वायूच्या स्पर्शाचे ज्ञान होणार नाही, तेव्हा प्राण अपानाची गती सम झाली आहे असे समजावे. या दोन्हींची गती सम झाल्यावर (परमात्मा हेच लक्ष्य असल्याने) मनाने स्वाभाविकच परमात्म्याचे चिंतन होऊ लागते. ध्यानयोगात या प्राणायामाची

* ध्यानयोग साधकाला स्वतंत्रतेने परमात्मप्राप्ती करवितो आणि कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोगाच्या साधकाकडूनही याचा उपयोग केला जाऊ शकतो. जप, ध्यान, सत्संग आणि स्वाध्याय—हे प्रत्येक साधकासाठी उपयोगाचे आहे आणि आवश्यकही आहे.

आवश्यकता असल्यानेच याचा उपर्युक्त पदामध्ये उल्लेख केला गेला आहे.

**यतेन्द्रियमनोबुद्धिः**—प्रत्येक मनुष्यात एक इंद्रियांचे ज्ञान राहते आणि एक बुद्धीचे ज्ञान. इंद्रिये आणि बुद्धी दोन्हींच्या मध्यभागी मनाचा निवास असतो. मनुष्याने हे पाहिले पाहिजे की, त्याच्या मनावर इंद्रियांच्या ज्ञानाचा प्रभाव आहे किंवा बुद्धीच्या ज्ञानाचा प्रभाव आहे, अथवा अंशिक रूपाने दोन्हींच्या ज्ञानांचा प्रभाव आहे. इंद्रियांच्या ज्ञानात ''संयोगा'' चा प्रभाव पडतो आणि बुद्धीच्या ज्ञानात ''परिणामाचा''. ज्या मनुष्याच्या मनावर केवळ इंद्रियांच्या ज्ञानाचा प्रभाव आहे, ते संयोगजन्य सुख भोगातच मग्न असतात आणि ज्यांच्या मनावर बुद्धीच्या ज्ञानाचा प्रभाव आहे ते (परिणामाकडे दृष्टी राहत असल्याने) सुखभोगाचा त्याग करण्यात समर्थ होत असतात. ''**न तेषु रमते बुधः**'' (५। २२)

बहुतेक साधकांच्या मनावर अंशिकरूपाने इंद्रिये आणि बुद्धी—दोन्हींच्या ज्ञानांचा प्रभाव राहत असतो. त्यांच्या मनात इंद्रिये आणि बुद्धीच्या ज्ञानाचे द्वंद्व युद्ध सुरू असते. म्हणून ते आपल्या विवेकाला महत्त्व देऊ शकत नाहीत आणि जे करू इच्छितात ते करूही शकत नाहीत. हे द्वंद्वच ध्यानात बाधक आहे. म्हणून या ठिकाणी मन, बुद्धी तसेच इंद्रियांना वश करण्याचे तात्पर्य मनावर केवळ बुद्धीच्या ज्ञानाचा प्रभाव रहावा, इंद्रियांच्या ज्ञानाचा प्रभाव संपूर्णपणे समाप्त व्हावा, हे आहे.

**मुनिर्मोक्षपरायणः**—परमात्मप्राप्ती करणेच ज्याचे लक्ष्य आहे अशा परमात्मस्वरूपाचे मनन करणाऱ्या साधकाला या ठिकाणी ''**मोक्षपरायणः**'' म्हटले गेले आहे. परमात्मतत्त्व सर्व देश, काल इत्यादीत परिपूर्ण असल्यामुळे सदा सर्वदा सर्वांना प्राप्तच आहे. परंतु दृढ उद्देश नसल्याकारणाने अशा नित्यप्राप्त तत्त्वाच्या अनुभूतीत उशीर होत आहे. जर असा एक दृढ उद्देश झाला तर तत्त्वाच्या अनुभूतीत उशीर लागण्याचे काहीही कारण नाही. वास्तविक दृष्ट्या पूर्वीपासूनच हा उद्देश बनलेला आहे, कारण परमात्मप्राप्तीसाठीच हे मनुष्यशरीर मिळालेले आहे. केवळ या उद्देशाला ओळखावयाचे आहे. जेव्हा साधक या उद्देशाला ओळखतो तेव्हा त्याचे ठिकाणी परमात्मप्राप्तीची लालसा उत्पन्न होत असते. ही लालसा संसाराच्या सर्व कामनांना समाप्त करून, साधकाला परमात्मतत्त्वाचा अनुभव करविते. म्हणून परमात्मप्राप्तीच्या उद्देशाला ओळखण्यासाठीच या ठिकाणी ''**मोक्षपरायणः**'' पदाचा प्रयोग झालेला आहे.

कर्मयोग, सांख्ययोग, ध्यानयोग, भक्तियोग इत्यादी सर्व साधनात एक दृढ निश्चय अथवा उद्देशाची फार मोठी आवश्यकता आहे. जर आपल्या कल्याणाचा उद्देशच दृढ झाला नाही तर साधनाने सिद्धी कशी मिळेल? म्हणून या ठिकाणी ''**मोक्षपरायणः**'' पदाने ध्यानयोगात दृढ निश्चयाची आवश्यकता सांगितली गेली आहे.

**विगतेच्छाभयक्रोधो यः**—आपल्या इच्छेच्या पूर्तीत बाधा आणणाऱ्या प्राण्याविषयी, आपल्यापेक्षा बलवान असलेले समजल्यावर, त्याच्यापासून भय उत्पन्न होते आणि दुर्बल असल्याचे समजल्यावर, त्याच्याविषयी क्रोध उत्पन्न होतो. तसेच जगण्याची इच्छा असल्यास मृत्यूपासून भय उत्पन्न होते आणि दुसऱ्याकडून आपली इच्छा पूर्ण करवून घेणे तसेच दुसऱ्यावर आपला अधिकार प्रस्थापित करण्याच्या इच्छेमुळे क्रोध उत्पन्न होतो. म्हणून भय आणि क्रोध उत्पन्न होण्यात इच्छाच मुख्य आहे. जर मनुष्यात इच्छा पूर्तीचा उद्देश नसेल तसेच एकमात्र परमात्मप्राप्तीचा उद्देश असेल तर भय-क्रोधसहित इच्छेचा संपूर्णपणे अभाव होऊन जातो. इच्छेचा सर्वथा अभाव झाल्यावर मनुष्य मुक्त होत असतो. कारण वस्तूंच्या आणि जगण्याच्या इच्छेनेच मनुष्य जन्म-मरणरूपी बंधनात सापडत असतो. साधकाने या गोष्टीचा गंभीरपणे विचार केला पाहिजे की, इच्छा केल्याने पदार्थ मिळतात काय? जगण्याची इच्छा केली असता मृत्यूपासून सुटका होते काय? वास्तविक सत्य परिस्थिती तर ही आहे की, आपण पदार्थ प्राप्त करण्याची इच्छाही पूर्ण करू शकत नाही तसेच मृत्यूपासून आपली सुटकाही करून घेऊ शकत नाही. म्हणून जर साधकाचा हा दृढ निश्चय होईल की, मला एका परमात्मप्राप्तीशिवाय काहीही नको आहे. तर तो वर्तमानकाळातच मुक्त होऊ शकतो. परंतु जर पदार्थांची आणि जगण्याविषयीची इच्छा राहीली, तर इच्छा कधी पूर्ण होणार नाही आणि मृत्यूच्या भयापासून बचावही होणार नाही. तसेच क्रोधापासूनही सुटका होणार नाही. म्हणून मुक्त होण्यासाठी इच्छारहित होणे आवश्यक आहे.

जर वस्तू मिळणारी असेल तर इच्छा केल्याशिवायही मिळेल आणि जर वस्तू मिळणारी नसेल, तर इच्छा करूनही मिळणार नाही. म्हणून वस्तूचे मिळणे अथवा न मिळणे, इच्छेच्या अधीन नाही तर कोणाच्या तरी विधानाच्या अधीन आहे. जी वस्तू इच्छेच्या अधीन नाही, त्याच्या इच्छेचा त्याग करण्यात कोणती कठीणता आहे? जर वस्तूची इच्छा पूर्ण होणारी असती, तर ती पूर्ण करण्याचा प्रयत्न केला असता आणि जर जिवंत राहण्याची इच्छा पूर्ण झाली असती, तर मृत्यूपासून आपली सुटका करून घेण्याचा प्रयत्न केला

असता. परंतु इच्छेनुसार सर्व वस्तू मिळत नाहीत आणि मृत्यूपासून बचावही होत नाही. जर वस्तूंची इच्छा निर्माण झाली नाही तर जीवन आनंदमय होते आणि जर जिवंत राहण्याची इच्छा ठेवली नाही तर मृत्यूही आनंदमय होतो. जेव्हा वस्तूंची इच्छा केली जाते आणि जेव्हा जिवंत रहावे असे वाटते, तेव्हाच जीवन कष्टमय वाटते आणि तेव्हाच मृत्यू कष्टमय वाटतो. म्हणून ज्याने वस्तूंचा आणि जिवंत राहण्याच्या इच्छेचा संपूर्णपणे त्याग केला आहे तो जिवंतपणीच मुक्त होतो, अमर होतो.

**सदा मुक्त एव सः**—उत्पत्ति-विनाशशील पदार्थांशी आपला संबंध मानणे हेच बंधन आहे. या मानलेल्या संबंधाचा सर्वथा त्याग करणेच मुक्ती आहे. जो मुक्त झालेला आहे त्याच्यावर कोणत्याही घटना, परिस्थिती, निंदा, स्तुती, अनुकूलता-प्रतिकूलता, जीवन-मरण इत्यादीचा किंचित्मात्रही परिणाम होत नाही.

**सदा मुक्त एव**—या पदांचे तात्पर्य, वास्तविक साधक स्वरूपाने सदा मुक्तच आहे, हे आहे. केवळ उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या वस्तूशी आपला संबंध मानल्यामुळे त्याला आपल्या मुक्त स्वरूपाचा अनुभव येत नाही. संसाराशी मानलेला संबंध मिटताच स्वत:सिद्ध मुक्तीचा अनुभव येतो.

**परिशिष्ट भाव**—बाह्य पदार्थांना बाहेरच सोडण्याचे तात्पर्य आहे—स्वयंला शरीरापासून वेगळे करणे की, शरीर मी नाही, शरीर माझे नाही आणि माझ्यासाठी नाही. या तीन गोष्टी प्रत्येक साधकाला मानाव्याच लागतील मग तो कोणत्याही योगमार्गाचा का असेना. शरीराशी आपला कोणताही संबंध मानणार नाही तर मुक्ती स्वाभाविक सिद्ध आहे.

पूर्वी चोवीसाव्या श्लोकात '**अन्तः**' शब्द आला होता, म्हणून येथे '**बाह्य**' दिला आहे. वास्तविक बाह्य कोणती वस्तू नाही, तर केवळ वृत्ती आहे. 'बाह्य' शब्दाचा प्रयोग दुसरी सत्ता मानल्यावरच होतो, परंतु वास्तविक सत्ता एकच आहे. म्हणून '**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यान्**' पदांचे तात्पर्य हे आहे की एका तत्त्वाशिवाय दुसऱ्या कोणत्या सत्तेची मान्यता राहू नये.

***संबंध**—भगवंतांनी योगनिष्ठा आणि सांख्यनिष्ठा यांचे वर्णन करून दोन्हीसाठी उपयोगी असलेल्या ध्यानयोगाचे वर्णन केले. आता सुगमतेने कल्याण करणाऱ्या भगवन्निष्ठेचे वर्णन करत आहेत.*

## भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्।
## सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति॥ २९॥

**माम्** = मला
**यज्ञतपसाम्** = सर्व यज्ञ आणि तप यांचा
**भोक्तारम्** = भोक्ता,
**सर्वलोकमहेश्वरम्** = संपूर्ण लोकांचा महान् ईश्वर (तसेच)
**सर्वभूतानाम्** = संपूर्ण प्राण्यांचा
**सुहृदम्** = सुहृद (स्वार्थरहित दयाळू आणि प्रेमी)
**ज्ञात्वा** = जाणून (भक्त)
**शान्तिम्** = शांतीला
**ऋच्छति** = प्राप्त होतो.

*व्याख्या*—**भोक्तारं यज्ञतपसाम्**—जेव्हा मनुष्य एखादे शुभ कर्म करतो, तेव्हा तो ज्याने शुभ कर्म करतो त्या शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ इत्यादींना आपले मानतो आणि ज्याच्यासाठी शुभ कर्म करतो त्याला त्या कर्माचा भोक्ता मानतो. जसे एखाद्या देवतेची पूजा केली, तर त्या देवतेला पूजारूपी कर्माचा भोक्ता मानतो, कोणाची सेवा केली, तर त्याला सेवारूपी कर्माचा भोक्ता मानतो. एखाद्या भुकेल्या व्यक्तीस अन्न दिले, तर त्याला अन्नाचा भोक्ता मानतो—इत्यादी. या मान्यतेला दूर करण्यासाठी भगवान् उपर्युक्त पदांत म्हणतात की, वास्तविक संपूर्ण शुभ कर्मांचा भोक्ता मीच आहे. कारण प्राणीमात्राच्या हृदयात भगवानच विद्यमान आहेत. * म्हणून कोणाचे पूजन करणे, कोणाला अन्न-पाणी देणे, कोणाला मार्ग दाखविणे इत्यादी जितकी काही शुभ कर्मे आहेत, त्या सर्वांचा भोक्ता भगवंतालाच समजले पाहिजे. लक्ष्य भगवंतच असले पाहिजे, प्राणी नव्हे.

नवव्या अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकातही भगवंतांनी आपल्याला संपूर्ण यज्ञांचा भोक्ता म्हटले आहे "**अहं हि सर्व यज्ञानां भोक्ता**"

दुसरी गोष्ट ही आहे की, ज्यांच्याद्वारा शुभ कर्म केली जातात ते शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ इत्यादी आपले नाहीत तर भगवंताचे आहेत. त्यांना आपले समजणे अज्ञानच आहे. त्यांना आपले समजून आपल्यासाठी शुभ कर्म केल्याने

* "हृदि सर्वस्य विष्ठितम्" (१३।१७), "सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः" (१५।१५), "ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति" (१८।६१)

मनुष्य स्वत: त्या कर्माचा भोक्ता होतो. म्हणून भगवान् म्हणतात की, तू संपूर्ण शुभ कर्मांना आपल्यासाठी कधीही करू नको, केवळ माझ्याकरिताच कर. असे केल्याने तू त्या कर्माचा फलभागी होणार नाहीस आणि तुझा कर्माशी संबंध-विच्छेद होऊन जाईल.

कामनेनेच संपूर्ण अशुभ कर्म होत असतात. कामनेचा त्याग करून केवळ भगवंतासाठीच सर्व कर्म केल्याने अशुभ कर्म तर मुळातच घडणार नाहीत. तसेच शुभ कर्मांशी आपला संबंध राहत नाही. अशा प्रकारे संपूर्ण कर्माशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यास परमशांती प्राप्त होते.

**सर्वलोकमहेश्वरम्**—निरनिराळ्या लोकांचे निरनिराळे ईश्वर असू शकतात. तरीपण तेही भगवंताचे अधीनच आहेत. भगवान् संपूर्ण लोकांच्या ईश्वरांचेही ईश्वर आहेत. म्हणून या ठिकाणी ''**सर्वलोकमहेश्वरम्**'' पद दिले गेले आहे. तात्पर्य संपूर्ण सृष्टीचे एकमात्र स्वामी भगवान्‌च आहेत तर मग एखादी प्रामाणिक व्यक्ती सृष्टीच्या कोणत्याही वस्तूला आपली कशी मानू शकते?

शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण, स्त्री, पुत्र, धन, जमीन, घर इत्यादींना आपले मानून बहुतेक लोक म्हणत असतात की, भगवानच संपूर्ण संसाराचे मालक आहेत. परंतु असे म्हणणे समजदारपणा नव्हे, कारण मनुष्य जोपर्यंत शरीर, इंद्रिये, मन इत्यादींना आपले मानतो तोपर्यंत भगवंताला संपूर्ण संसाराचे मालक म्हणणे, म्हणजे आपण आपल्याला धोका देणेच आहे. कारण जर सर्वच लोक शरीरादीं पदार्थांना आपापलेच मानत राहतील तर भगवंताचे काय शिल्लक राहिले? ज्याचे स्वामी भगवान् म्हणविले जातील अर्थात् भगवंताच्या वाट्याला काहीही शिल्लक राहिले नाही. म्हणून ''सर्व काही भगवंताचे आहे'' असे तोच म्हणू शकतो, जो शरीरादी कोणत्याही पदार्थाला आपले मानत नाही. जो कोणत्याही वस्तूला आपली मानतो तो वास्तविक भगवंताला यथार्थरूपाने सर्वलोकमहेश्वर मानतच नाही. तो जितक्या वस्तूंना आपली मानतो तितक्या अंशात भगवंताला सर्वलोकमहेश्वर समजण्यात उणीव राहत असते.

मनुष्याला शरीरादी पदार्थांचा सदुपयोग करण्याचा अधिकार आहे, आपले समजण्याचा मुळीच नाही. या पदार्थांना आपले न मानता केवळ भगवंताचेच समजून त्यांच्याच सेवेत उपयोगात आणल्याने परमशांतीची प्राप्ती होत असते.

**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति**—जे संपूर्ण लोकांच्या ईश्वरांचेही ईश्वर आहेत ते कारणाशिवाय स्वाभाविकच प्राणीमात्राचे हित करणारे, प्राणीमात्राचे रक्षण करणारे तसेच प्राणीमात्राशी प्रेम करणारे आहेत आणि असा हितैषी, रक्षक तसेच प्रेमी दुसरा कोणी नाही—अशा प्रकारे जाणून घेतल्याने * परमशांती प्राप्त होते, कारण ते वास्तविक तसेच आहेत. महान् शक्तिशाली भगवान् कोणत्याही प्रयोजनाशिवाय आपले परम सुहृद आहेत मग भय, चिंता, उद्वेग, अशांती इत्यादी कसे होऊ शकतात?

जीवमात्राचे कारणाशिवाय कल्याण करणारे दोघेच आहेत—एक भगवान् आणि दुसरे त्यांचे भक्त!† भगवंताला कोणाकडून काहीही मिळवावयाचे नाहीच—''**नानवाप्तमवाप्तव्यम्**'' (३।२२) म्हणून ते स्वाभाविकच सर्वांचे सुहृद आहेत. भक्तही आपल्यासाठी कोणाकडून काहीही इच्छित नाही आणि सर्वांचे हित इच्छितो आणि हित करतो, म्हणून तोही सर्वांचा सुहृद् असतो—''**सुहृदः सर्वदेहिनाम्**'' (श्रीमद्भा० ३।२५।२१). भक्तात जी सुहृत्ता येत असते, तीही मुळात भगवंतापासूनच येत असते.

भगवान् संपूर्ण यज्ञ आणि तप यांचे भोक्ते आहेत, संपूर्ण लोकांचे महान ईश्वर आहेत, तसेच आपले परम सुहृद् आहेत—या तिन्ही गोष्टीपैकी एक गोष्ट जरी दृढतेने मानली तर भगवत्प्राप्तीरूपी परमशांतीची प्राप्ती होते, तर-मग तिन्हीही गोष्टी दृढतेने मानल्या तर मग सांगावयाचेच काय?

आपल्यासाठी काहीही इच्छिणे, कोणत्याही वस्तूला आपली समजणे आणि भगवंताला आपले न मानणे—ह्या तीन गोष्टी भगवत्प्राप्तीत मुख्य बाधक आहेत. भगवान् ''**भोक्तारं यज्ञतपसाम्**'' पदाने म्हणतात की, आपल्यासाठी काहीही इच्छू नये आणि काहीही करू नये, ''**सर्वलोकमहेश्वरम्**'' या पदाने म्हणतात की, आपले काहीही समजू नये अर्थात् सुखाच्या इच्छेचा आणि वस्तू-व्यक्ती इत्यादीवरील अधिकाराचा त्याग करावा तसेच ''**सुहृदं सर्वभूतानाम्**'' पदाने म्हणतात की, केवळ मलाच आपले समजा इतर कोणत्याही व्यक्ती-वस्तू इत्यादींना आपले समजू नका. या तिन्हीपैकी कोणतीही एक गोष्ट मानली तर उरलेल्या दोन गोष्टी आपोआप बाणतात आणि भगवत्प्राप्ती होते.

जेव्हा मनुष्य कोणत्याही प्राणी-पदार्थाला आपले समजणार नाही. तेव्हाच आपल्यासाठी केलेल्या सुखाच्या इच्छेचा त्याग होतो. जोपर्यंत कोणत्याही पदार्थाला आपले समजत आहे, तोपर्यंत तो मोबदल्यात सुखाची इच्छा

---

* या ठिकाणी जाणण्याचा अर्थ दृढतेने मानणे हा आहे. मानणे जाणण्यापेक्षा दुर्बल नसते. म्हणून दृढतेने मानणेही जाणणेच आहे.

† हेतु रहित जग जुग उपकारी। तुम्ह तुम्हार सेवक असुरारी॥ (मानस ७।४७।३)

ठेवीलच. सुखाच्या इच्छेच्या त्यागाने ममतेचा त्याग आणि ममतेच्या त्यागाने सुखाच्या इच्छेचा त्याग होत असतो. जेव्हा सर्व व्यक्ती-वस्तूंमध्ये ममतेचा त्याग होत असतो तेव्हा एकमात्र भगवानच आपले राहतात. जो कोणालाही आपले समजतो तो वास्तविक भगवंताला संपूर्णपणे आपले समजत नाही. मग जरी तो लोकांना सांगत असेल की, भगवंत माझे आहेत. मानलेल्या संबंधाचा अभाव झाल्याने भगवंताशी आपली खरी आत्मीयता जागृत होते. तात्पर्य हे निघाले की, मग सुखाच्या इच्छेचा त्याग होवो, ममतेचा अभाव होवो अथवा भगवंताविषयी खरी आत्मीयता जागृत होवो, हे होताच परमशांतीचा अनुभव होईल. कारण एकही जर भाव दृढ झाला तर इतर भावसुद्धा बरोबर येतातच.

एक तर कर्म केले पाहिजे आणि दुसरे कर्म करण्याची विद्या आली पाहिजे. जेव्हा मनुष्य कर्म तर करतो, परंतु कर्म करण्याची विद्या जाणत नाही अथवा कर्म करण्याची विद्या तर जाणतो परंतु कर्म करत नाही, तेव्हा त्याच्याद्वारा कर्म यथायोग्य रीतीने होत नाहीत. म्हणून भगवंतांनी तिसऱ्या अध्यायात कर्म करण्यावर विशेष भर दिला आहे. परंतु त्या बरोबरच कर्माला जाणण्याविषयीही म्हटले आहे आणि चौथ्या अध्यायात कर्माचे तत्त्व जाणण्यावर विशेष भर दिला आहे आणि बरोबरच कर्म करण्याविषयीही म्हटले आहे. पाचव्या अध्यायात जरी कर्मयोग आणि सांख्ययोग—दोन्हीही-द्वारा कल्याण होण्याविषयी गोष्ट आली आहे, तरीपण भगवंतांनी सांख्ययोगापेक्षा कर्मयोगाला श्रेष्ठ म्हटले आहे. या अध्यायात भगवंतांनी क्रमाने कर्मयोग आणि सांख्ययोग यांचे वर्णन करून मग संक्षेपाने ध्यानयोगाचे वर्णन केले आणि शेवटी भक्तियोगाचे संक्षेपाने वर्णन केले जे भगवंताचे मुख्य प्रयोजन आहे.

*ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां*
*योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मसन्न्यासयोगो नाम पञ्चमोऽध्याय: ॥ ५ ॥*

**अशा प्रकारे ॐ तत्, सत् या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादामधील ''कर्मसन्न्यासयोग'' या नावाचा पाचवा अध्याय पूर्ण झाला.**

कर्मयोग आणि सांख्ययोग—या दोन्हींचेही वर्णन असल्यामुळे या पाचव्या अध्यायाचे नाव ''कर्मसंन्यासयोग'' असे आहे.

## पांचव्या अध्यायामधील पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात ''**अथ पञ्चमोऽध्याय:**'' ची तीन, ''**अर्जुन उवाच**'' इत्यादी पदाची चार, श्लोकांची तीनशे बावन्न आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग तीनशे बहात्तर आहे.

(२) या अध्यायात ''**अथ पञ्चमोऽध्याय:**'' ची सात, ''**अर्जुन उवाच**'' इत्यादी पदांची तेरा, श्लोकांची नऊशे अठ्ठावीस आणि पुष्पिकेची अठ्ठेचाळीस अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग नऊशे शहाण्णव आहे. या अध्यायाचे सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात दोन ''**उवाच**'' आहेत. एक ''**अर्जुन उवाच**'' आणि एक ''**श्रीभगवानुवाच**''

## पाचव्या अध्यायात प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या एकोणतीस श्लोकांपैकी तेराव्या आणि एकोणतीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात ''नगण'' प्रयुक्त झाल्याने ''**न विपुला**'' आणि बावीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात ''मगण'' प्रयुक्त झाल्याने ''**म-विपुला**'' संज्ञा असणारे छन्द आहेत. बाकीचे सव्वीस श्लोक ठीक ''**पथ्यावक्त्र**'' अनुष्टुप् छन्दाच्या लक्षणांनी युक्त आहेत.